# भक्तिविजयकथासार



हें पुस्तक

हरि विठ्ठल अड्डरकर,

यांनीं तयार केलें. तें

## पुरंदर आणि कंपनीनें

सर्व हक्कांसह विकत घेऊन

मुंबईंत:—‘ गणपत कृष्णाजी प्रेस कं० ’

छापखान्यांत छा० प्रसिद्ध केलें.

आवृत्ति ३ री.

सन १९१०, शके १८३१.

किंमत १ रुपया.

# अथ पांडुरंगाचे श्लोक.



विठो पंढरी भूमि वैकुंठ केली॥ स्वदासांसवें तूं क-
राया सुकेली ॥ सदा रंगही इच्छिसी साधुसंगा ॥
नमस्कार माझा तुला पांडुरंगा ॥ १ ॥ विभो भ-
क्तिनें मोक्षही तुच्छ केला ॥ गुणां गावया वेद तो-
ही भुकेला ॥ धरी पाउलें स्वर्णदी चंद्रभागा ॥ न-
मस्कार माझा तुला पांडुरंगा ॥ २ ॥ हरे तूमची
व्यक्ति केली अजाची ॥ अशी भक्ति त्या पुंड-
लीकद्विजाची ॥ नतीं क्रीडसी त्यागुनी श्रीरमां-
ना ॥ नम० ॥ ३ ॥ प्रभो पाउलीं चित्तवृत्ती मुरा-
वी ॥ सदा प्रेम सत्कीर्ति लोकीं उरावी ॥ मनाची-
हि ने वासना तुच्छ भंगा ॥ नमस्कार माझा तुला
पांडुरंगा ॥ ४ ॥ कृपाळा बहू राखिले दीन दास ॥
नको होउं बापा मला तूं उदास ॥ त्वरें उद्धरीं देउ-
नी नामगंगा॥ नमस्कार माझा तुला पांडुरंगा॥५॥

अजा माउली सर्व विश्वास दावी ॥ क्षणाचा न आ-
युष्य विश्वास दावी ॥ ह्मणोनी त्वरें इच्छितों पाद-
संगा ॥ नमस्कार माझा तुला पांडुरंगा ॥६॥ भव-
भ्रा भवाब्धी भरे पूर्ण पाणी ॥ बुडालों सख्या धां-
व दे तूर्ण पाणी ॥ जनीं आदिमाया करी थोर दं-
गा॥ नमस्कार माझा तुला पांडुरंगा ॥७॥ रमेशा
मला अल्पघोला विलोकीं ॥ तुझ्या भक्तिनें धन्य
होईन लोकीं ॥ तरी तूर्ण नारायणा दे सुसंगा ॥
नमस्कार माझा तुला पांडुरंगा ॥ ८ ॥



# अनुक्रमणिका.


| गोष्ट | पृष्ठ |
|---|---|
| १ अवतार घेण्याविषयीं भक्तांस देवाची आज्ञा | १ |
| २ जयदेव स्वामी | २ |
| ३ तुळसीदास | ७ |
| ४ नामदेव | १३ |
| ५ कबीर | १९ |
| ६ कमाल | २२ |
| ७ कबीरानें गुरु केला | २४ |
| ८ ज्ञानेश्वर | २७ |
| ९ ज्ञानदेवलीलावर्णन | ३२ |
| १० ज्ञानदेवाची व नामदेवाची भेट | ४१ |
| ११ कबीर | ४८ |
| १२ " | ५१ |
| १३ नामदेव | ५७ |
| १४ " | ६२ |
| १५ " | ६४ |
| १६ कूर्मदास | ६६ |
| १७ राकाकुंभार | ७० |
| ,, गोराकुंभार | ७२ |
| १८ विसोबा खेचर | ७५ |
| ,, परिसा भागवत | ७७ |
| १९ जगमित्र नागनाथ | ८१ |
| २० जोगापरमानंद | ८३ |
| " नरहरी सोनार | ८५ |
| २१ जनाबाई | ८९ |
| २२ मछिंद्रनाथ | ९३ |
| २३ सांखामेळा | १०० |
| २४ पद्मनाभचरित्र | १०४ |
| २५ रोहिदास चांभार | १०७ |
| २६ पिपाजी राजा | १०८ |
| २७ नरसी महता | ११० |
| २८ नरसी मेहत्याच्या मुलाचें लग्न | ११२ |
| २९ देव नरसी मेहत्याची हुंडी भरतो | ११४ |
| ३० नरसीमेहत्याच्या मुलीचें ओटभरण | ११६ |
| ३१ रामदासस्वामी | ११९ |

| गोष्ट | पृष्ठ |
|---|---|
| ३२ ब्रह्मचारी व कल्याण | १२१ |
| ३३ सूरदासचरित्र | १२४ |
| ३४ मनान्हावी | १२५ |
| ३५ सात्त्विक राजा | १२७ |
| कर्माबाई चरित्र | १२९ |
| ३६ जनज मांवत व सूरदास मनमोहन | १३१ |
| ३७ रसिक मुरार | १३४ |
| ३८ मिराबाई ... | १३७ |
| ३९ कान्होपात्रा | १३९ |
| ४० दामाजी पंत | १४१ |
| ४१ शांतब्राह्मणी बादशाहा | १४४ |
| ४२ भानुदासचरित्र | १४७ |
| ४३ रामराजाचें चरित्र | १५० |
| ४४ बहिरंभट व नागनाथ | १५५ |
| ४५ एकनाथचरित्र | १५७ |
| ४६ देव एकनाथाचे नोकर होतात | १५९ |
| ४७ रामदास | १६४ |
| ४८ तुकाराम | १६७ |
| ४९ तुकारामाची स्त्री संसार दान देते | १७३ |
| ५० तुकारामाची व गजाननाची पंगत | १७८ |
| ५१ तुकाराम देवास आपले भेटीस बोलावितो | १८१ |
| ५२ तुकारामाचा व देवाची भेट | १८५ |
| ५३ बाधले बुवा | १९१ |
| ५४ बोधल्यानें हांसीस मुक्त केलें ... | १९८ |
| ५५ गणेशनाथ | २०३ |
| ५६ केशवस्वामी... | २०५ |
| ५७ गोमाई आवा... | २०७ |
| ५८ संतोबापवार ... | २०९ |
| ५९ निळोबासंत ... | २१३ |
| ६० उद्धवचिद्घन... | २१४ |
| ६१ विसोबा सराफ | २१५ |

॥ श्री ॥

# भक्तिविजयकथासार.

## गोष्ट १ ली.

### अवतार घेण्याविषयीं भक्तांस देवाची आज्ञा.

श्रीकृष्णअवतार संपल्यावर कलियुगांत यज्ञयागादि धर्म बुडाले. ब्राह्मणक्षत्रियादि वर्णांनीं आपापले आचार-विचार सोडून दिले; दुष्ट कर्म आचरूं लागले. जन साधुं-ची निंदा करूं लागले. त्यामुळें पृथ्वीवर पाप फार हो-ऊन पृथ्वी कंपायमान झाली. तेव्हां भगवान भक्तांस ह्मणाले-या पृथ्वीवर अधर्म फार झाल्याकारणानें अ-ज्ञानीजन पापरूपी समुद्रांत बुडत आहेत, तरी याला काय उपाय करावा ? भक्त ह्मणाले,-आह्मांस आज्ञा द्यावी ह्मणजे आपल्या सांगण्याप्रमाणें आपलें आह्मी वर्तन ठेवूं. क्षीरसागर-वासी भगवान ह्मणाले-मी मागें अवतार धरून सर्व दुष्टदैत्यांचा संहार करून पृथ्वी निर्वैर केली व आतां बौद्धावतार घेऊन बसलों आहें, तरी तुह्मीं मृत्युलोकीं महाक्षेत्रीं अव-तार धारण करून अज्ञानी जनांस भक्तीस लावावें. उद्धवा,

तूं पंढरीच्या ठायीं; अक्रूरा, तूं मथुरा, गोकुळ येथें; रामदासा, तूं पश्चिमदेशीं; पूर्व देशीं व्यासानें; हस्तिनापुरीं वाल्मिकानें. याप्रमाणें जन्म घेऊन माझा नाममहिमा प्रगट करावा. तसेंच शुका, तूं कबीर; शंकरा, तूं नरसीमेहता हो व मी ज्ञानेश्वराचा अवतार घेऊन गीतेचा अर्थ सांगेन. सदाशिव निवृत्ति होईल; ब्रह्मदेव सोपान व आदिमाया मुक्ताबाई होईल. याप्रमाणें भगवंताची आज्ञा घेऊन भक्त आपापले ठिकाणीं जाऊन नाममहिमा प्रगट करूं लागले.

## गोष्ट २ री.

### जयदेव स्वामी.

जगन्नाथ नामें नगरींत एक ब्राह्मण राहत असे. त्याच्या पोटीं व्यासांनीं अवतार घेतला. त्याचें नांव जयदेव असें ठेविलें. त्याला विद्याभ्यास शिकवून सर्व शास्त्रांमध्यें निपुण केला नंतर त्याचें मौंजीबंधन केलें. पुढें त्यानें ‘ गीतगोविंद ’’ नांवाचा एक ग्रंथ केला; तो लोकांस फारच आवडून लोक त्याचा पाठ करूं लागले. असें त्या नगरींतील सात्विक नांवाच्या राजानें पाहून, आपणही एक ग्रंथ तयार करून त्याचा सर्व लोकांस पाठ करावयास सांगूं लागला. परंतु तो ग्रंथ त्यांस न आवडून राजास ह्मणाले—तूंच त्याचें पठण कर. तूं मनांत गर्व धरून जयदेवाची निंदा करावी या हेतूनें हा ग्रंथ

केलास तो आह्मांस मानवतनाहीं. असें ऐकतांच राजा ह्मणाला, तर मग जयदेवाचा व माझा असे दोन्ही ग्रंथ जगन्नाथाचे देवळांत ठेवून, बाहेरून कुलपें लावावीं. ज्याचा ग्रंथ देवास पसंत पडेल तो देवळांत ठेवील आणि ज्याचा नापसंत होईल तो बाहेर फेंकून देईल. ती गोष्ट सर्व लोकांस मान्य होऊन, दोन्ही ग्रंथ देवळांत टाकून दरवाजे बंद केले. सकाळीं येऊन पाहतात तों राजाचा ग्रंथ बाहेर पडलेला आहे व जयदेवाचा आंत आहे असें दृष्टीस पडलें. तेव्हां राजाला आपला अपमान झालेला सहन न होऊन, देवास ह्मणाला–देवा, त्वां माझा अव्हेर कां केलास? मी आतां तुझ्या पायांजवळ जीव देईन. असा राजाचा निश्चय पाहून देवानें त्याची समजूत घालून त्यांतील चोवीस श्लोक काढून जयदेवाचे ग्रंथांत घातले. असें पाहतांच राजाचें समाधान होऊन राजा नमस्कार करून जाता झाला.

त्याच नगरांत एक अग्निहोत्री ब्राह्मण राहत असे. त्याला एक सर्वगुणसंपन्न अशी पद्मावती नांवाची कन्या होती. तिला मागण्याकरितां देशोदेशींचे लोक येऊं लागले. त्यांना तिचा बाप ह्मणाला–मी ही कन्या जगन्नाथास अर्पण केली आहे. त्याच रात्रीं देव ब्राह्मणाचे स्वप्नांत जाऊन ह्मणाले–मी बौद्ध अवतार धारण केला आहे, तरी जयदेव हा माझा अंश आा त्याला तूं आपली कन्या अर्पण करावीस.

असें त्या ब्राह्मणानें स्वप्न पाहतांच सुमुहूर्त पाहून आपली कन्या जयदेवास अर्पण करून लग्नसोहळा मोठ्या थाटानें केला. नंतर जयदेव हरिकीर्तन करूं लागला. अशी त्याची प्रख्याति एका दूरदेशच्या सावकारानें ऐकून जयदेवाचे भेटीस आला व आपल्या घरीं घेऊन गेला. तेथें एक महिना राहून हरिकीर्तन करून अज्ञानीजनांस भक्तीस लाविलें एक महिन्यानंतर जयदेव सावकाराशीं घरीं जाण्याबद्दल आज्ञा मागूं लागला. तेव्हां सावकारानें वस्त्रालंकारांनीं एक रथ भरून, बरोबर एक सेवक देऊन त्याची पाठवणी केली. जयदेव रथांत बसून अर्ध्या वाटेंत आल्यावर, सेवकास मागें पाठवून दिलें. नंतर दोन चोर समोर येऊन उभे राहिले. त्यांस जयदेव ह्मणाला—तुमची काय इच्छा आहे ? चोर ह्मणाले—आह्मांस वस्त्रालंकार द्यावे. जयदेव सर्व वस्त्रालंकार त्यांस देऊन चालता झाला. चोरांनीं पुन्हां विचार केला कीं, जर याला जिवंत सोडला तर हा सावकारास सांगून आह्मांस शिक्षा करवील. तरी याचे हातपाय तोडून टाकावे. असा विचार करून त्याचे दोन्ही हातपाय तोडून त्यास पर्वांत लोटून दिलें. तेथेंच तो विष्णुभजन करीत आनंदानें राहिला. त्याच दिवशीं क्रौंच नांवाचा एक राजा शिकारीकरितां फिरत तेथें आला; त्यानें जयदेवास पाहतांच नमस्कार केला व ह्मणाला-स्वामी! तुमची अशी अवस्था कां बरें झाली? जयदेव ह्मणाला-मी जन्मापासून

असाच आहे. राजानें हें ऐकतांच त्याला रथावर बसवून आपल्या घरीं नेला व त्याची सेवाचाकरी करण्याकरितां सेवक ठेविले व त्याचा उपदेश घेऊन ह्मणाला-महाराज, मला कांहीं तरी आज्ञा द्यावी. जयदेव ह्मणाला-आपण संतसेवा करावी. त्या दिवसापासून जे कोणी संत येतील त्यांची पुजा करून इच्छित हेतु पुर्ण करीत असे. ही खानमी त्या चोरांस कळली. तेव्हां त्यांनीं विचार केला कीं, आपणही संत होऊन जावें. नंतर ते दोघे त्या राजाकडे गेले. पण जयदेव तेथें आहे हें त्यांना माहीत नव्हतें. जयदेवानें चोरांस पाहतांच सिंहासनावरून खा-लीं उतरून आलिंगन दिलें व राजाकडून त्यांची चांगली व्यवस्था ठेवून इच्छा पुर्ण करविली. पुढें कांहीं दिव-सांनीं ते जाण्यास निघाले तेव्हां राजानें त्यांना दोन रथ द्रव्यानें भरून दिले, व बरोबर सेवक देऊन रवानगी केली. अर्ध्या वाटेंत आल्यावर सेवक चोरांस ह्मणाला-सर्व संतां-पेक्षां आपल्यावर स्वामींची कृपा जास्त होती याचें कारण काय? संतरूपी चोर ह्मणाले-आह्मी पूर्वी एका दुष्ट राजाक-डे होतों त्या ठिकाणीं हे स्वामी प्रधान होते व आह्मीं सेवक होतों. तेथें ह्या प्रधानाच्या हातुन अपराध घडल्यामुळें रा-जानें ह्यास ठार मारण्याकरितां आह्मांस आज्ञा दिली. तेव्हां आह्मीं त्यांना अरण्यांत नेऊन हातपाय तोडून पेवांत टाकून दिलें. नंतर घरीं आऊन चाकरी सोडून देऊन,

विष्णुभक्ति करूं लागलों. असें बोलत आहेत तोंच पृथ्वी कंपायमान होऊन दुभंग झाली व रथासहित ते चोर आंत नाहींसे झाले. असें त्या सेवकांनीं पाहतांच, त्यांस, आश्चर्य वाटून नगरांत येऊन सर्व हकीगत सांगते झाले. ती ऐकतांच, जयदेवास दुःख वाटून देवाचा धांवा करून ह्मणाला-देवा, माझे शत्रूंस अधोगतीस कां पाठविलेंस ? अशी करुणा ऐकून देव प्रसन्न होऊन जयदेवाचे हातपाय देता झाला. असा चमत्कार राजानें पाहतांच, जयदेवास प्रश्न केला; तेव्हां जयदेवानें सर्व हकीगत सांगितली. नंतर राजानें सेवक पाठवून पद्मावतीस बोलावून आणविलें. व आपल्या राणीस तिची सेवा करावयास सांगितलें.

एके दिवशीं कांहीं स्त्रिया बसल्या असतां राणीचा भाउ मरण पावला व त्याची बायको सती जात आहे अशी बातमी दूत घेऊन आला. तें ऐकून सर्वजणी रडूं लागल्या, पण पद्मावती हंसून ह्मणाली-तुह्मीं रडतां कां ? भ्रतार मेल्यावर मागून सती जाणें यांत काय अर्थ ? पतीचें मरण ऐकतांच प्राण जाणें याला सती जाणें ह्मणतात. हें बोलणें राणीनें ध्यानांत ठेवून प्रधानास ह्मणाली-तुह्मीं जयदेव मरण पावला अशी बातमी नगरांत पाठवावी. पुढें कांहीं दिवसांनीं राजा जयदेवास बरोबर घेऊन शिकारीस गेला, तेव्हां प्रधानानें सेवकाबरोबर जयदेव मेल्याची बातमी नगरांत पाठविली. ती राणीनें ऐकून, राणी रडत पद्मा-

वतीस ह्मणाली–बाई आपल्या नवऱ्यास वाघानें मारलें. असें ऐकतांच पद्मावतीनें प्राण सोडला. संध्याकाळीं सर्व घरीं आल्यावर पाहतात तों हा अनर्थ झाला आहे. राजानें प्रधानाकडून चौकशी करविनां सर्व हकीकत कळली; तेव्हां राजास राग येऊन मनांत ह्मणाला–जर बायकोला मारावी तर स्त्रीहत्या होते, तरी आपणच अग्निकाष्ठ सेवन करावीं. असा विचार करून जयदेवाची आज्ञा घ्यावयास गेला; तेव्हां जयदेव ह्मणाला–तुह्मी प्राण देऊं नका. असें सांगुन कीर्तनास आरंभ केला, तेव्हां देव जयदेवास भेटले व पद्मावतीस सावध केलें. तेव्हांपासून सर्व जन जयदेवाचें चरित्र गाऊं लागले.

## गोष्ट २ री.

### तुळशीदास.

हस्तिनापुरांत एक कनोज ब्राह्मण राहत असे. त्याची भक्ति पाहून वाल्मिकानें त्याच्या पोटीं अवतार घेतला. त्याचें नांव तुळशीदास असें ठेविलें. तो पांच वर्षांचा झाल्यावर त्याचें मौंजीबंधन केलें व पुढें लग्नही केलें. तुळशीदासाची बायकोवर फारच प्रीति होती. तिला क्षणभरसुद्धां विसंबत नसे. एके दिवशीं अकबर राजानें तुलसीदासास दरबारांत नेल्यावर त्याच्या बायकोला माहेराहून बोलावणें आलें, तेव्हां ती माहेरीं निघून गेली.

संध्याकाळीं तुलसीदास घरीं आल्यावर आईबापांस विचारूं लागला. तेव्हां माहेरीं गेल्याबद्दल कळतांच. तसाच रात्रीचा सासुरवाडीस निघाला. कांहीं वेळानें सासऱ्याच्या घराजवळ आला तों जिकडे तिकडे सामसुम झालें आहे. दारें बंद आहेत, असें पाहून वरच्या खिडकींतून खालीं दोर सुटलेला त्याच्या दृष्टीस पडला ( पण तो दोर नसून सर्प होता ) त्याला धरून तो वर गेला व बायकोस जागी करून ह्मणाला—तूं मला टाकून कां वरें आलीस ? बायको ह्मणाली—पण तुह्मी वर कसे आलां ? तुलसीदास ह्मणाला-बारींतून सोडिलेल्या दोरानें वर आलों. असें ऐकतांच ती पहावयास गेली तों एक मोठा लोंबत असलेला सर्प दृष्टीस पडला. नंतर ती नवऱ्यास घेऊन घरीं आली व उपदेश करून ह्मणाली, तुह्मीं हा स्त्रीनाद सोडून द्या. जर त्या सर्पानें आपणांस दंश केला असता तर प्राणास मुकलों असतां ना ? असें बायकोचें वचन ऐकून त्याला पश्चात्ताप होऊन मनांत ह्मणाला—मी जडमूढांचा उद्धार करण्याकरितां अवतार घेतला असतां, या स्त्रीनादांत भुलून गेलों; तरी आतां तपश्चर्येस निघून जावें. अशा निश्चयानें वनांत जाऊन रामराम ह्मणत बसला. व शौचास जात असे तें उरलेलें पाणी दररोज एका झाडाच्या बुंधाशीं टाकी. तें पाणी तेथें एक पिशाच्च होतें तें पीत असे. याप्रमाणें बारा वर्षें पूर्ण होतांच एके दिवशीं भूत ‘ मी प्रसन्न झालें

असें ह्मणालें. तेव्हां तुलसीदास मनांत ह्मणाला, मी रामाचे प्रातीकरितां तप करीत असतां हें विघ्न कोठून आलें ? तुलसीदास ह्मणाला—तूं कोण आहेस ? पिशाच ह्मणालें,तूं बारावर्षे त्या झाडाच्या बुंधाशीं जें पाणी टाकलेंस तें पिऊन मी तृप्ति पावलों व तुला प्रसन्न झालों आहें. तर वर माग. तुलसीदास ह्मणाला—मला रामाचें दर्शन दे. भूत ह्मणालें—रामाचें नाहीं पण मी मारुतीचें दर्शन करून देतों. तुलसीदास ह्मणाला—ठीक आहे. पिशाच्च ह्मणालें—तूं पुराणएकावयास जातोस तेथें हातांत काठी, डोइस टोपी, आंगावर जीर्ण वस्त्र घेतलेला, एक, ह्मातारा ब्राह्मण येतो तोच मारुती होय. त्याचे चरण धर, ह्मणजे तो तुला रामाचें दर्शन करून देईल. दुसरे दिवशीं सांगितलेल्या खुणप्रमाणें त्या ब्राह्मणास ओळखून पाय धरले. तेव्हां तो ह्मणाला,—मज गरिबाचे तूं पाय कां धरलेस? तुलसीदास ह्मणाला—आपण रामसेवक हनुमान आहांत. असे शब्द एकतांच हा वाल्मिकाचा अवतार असें जाणून तो भेटला व काय इच्छा आहे म्हणून विचारलें. तेव्हां तुलसीदासानें रामदर्शन करविण्याबद्दल सांगितलें. तें मान्य करून हनुमान अदृश्य झाला. नंतर तो रामास भेटून सर्व हकीगत कळवून दर्शन देण्यास सांगितलें. रामानीं वानरदल सिद्ध करवून दुसरे दिवशीं तुलसीदासाचे आश्रमावरून जाते झाले. पण तुलसीदासानें ओळखलें नाहीं. सर्वांमागून मारुती

येऊन ह्मणाला-रामदर्शन झालें ना ? तुळसीदास ह्मणाला-नाहीं. नंतर तुळसीदासानें करुणास्वरानें प्रार्थना करतांच राम दर्शन देऊन अदृश्य झाले. तुलसीदासानें कीर्तन करून सर्वांस भक्तीस लाविलें. मग त्याला एक मठ बांधून दिला, तेव्हांपासून कोणी धान्य, कोणी द्रव्य देऊं लागले. यामुळें मठांत धान्याचा व द्रव्याचा संचय बराच झाला. तेव्हांपासून त्यानें असा क्रम ठेविला कीं, दररोज एक हजार ब्राह्मणांस जेवूं घालावें जेवण होऊन कीर्तन सुरू झाल्यानंतर आरती होऊन सर्व घरीं गेल्यावर तुळसीदास दारें मोकळीं ठेवून रामराम ह्मणत बसे. असें दोघां चोरांनीं पाहून द्रव्याच्या मोटा बांधून जाऊं लागले. तों दरवाज्यावरील धनुष्यधारी पुरुष जाऊं देईनात ह्मणून मोटा टाकून दिल्या व रिकामे बाहेर पळूं लागले. तरीही बाहेर जाण्यास मार्ग मिळेना. मग सकाळीं उजाडल्यावर ते दोघे तुलसीदासाच्या चरणावर मस्तक ठेवून ह्मणाले, आह्मी तुमच्या घरांतील द्रव्य चोरून नेत होतों, परंतु दरवाज्यावरील दोन पुरुष बाहेर जाऊं देईनात. हें ऐकून तुळसीदास पाहावयास गेला तों कोणी नाहीं. असें पाहून मनांत ह्मणाला-प्रभो ! काय ही भक्तकरुणा ! असें ह्मणून त्या चोरांस ह्मणाला-तुह्मांला पाहिजे तितकें सुवर्ण घेऊन जा. हें ऐकून चोर तुळसीदासाचे चरणीं लागून आह्मांस उपदेश द्या ह्मणून

ऊं लागले. त्यांची दुष्टबुद्धि गेली असें जाणून त्यांच्या मस्तकावर वरदहस्त ठेवून त्यानें ते आपल्यापाशीं ठेविले.

एके दिवशीं सर्व ब्राह्मण व भक्त भोजनास बसले असतां एक दुष्ट ब्राह्मण दाराजवळ येऊन, सीताराम म्हणून भिक्षा वाढा असें बोलूं लागला. तें तुळसीदासानें ऐकून त्याला आणून पानावर बसविलें. त्याला पाहतांच इतर ब्राह्मण ह्मणाले, हा ब्रह्महत्या करणारा ब्राह्मण आमचे पंक्तींत नको. तुळसीदास ह्मणाला—रामनामापुढें ब्रह्महत्या कोठून राहील ? ब्राह्मण ह्मणाले आपण कांहीं प्रचीत दाखवाल तर खरें समजूं. तुलसीदास ह्म०—काय प्रचीत दाखवूं ? ब्राह्मण ह्मणाले—विश्वेश्वराच्या देवळासमोरील नंदीकडून पानासह नैवेद्य भक्षण करवावा. नंतर तुळसीदासानें सर्वांस बरोबर घेऊन नैवेद्य नेऊन नंदीपुढें ठेविला व प्रार्थना करितांच नंदीनें नैवेद्य भक्षण केला असा चमत्कार पाहतांच त्या ब्राह्मणास बरोबर घेऊन भोजन करते झाले. व कीर्तनास बसले. त्याच दिवशीं जैतपाळ नामें एक सावकार मरण पावला. त्याची बायको सतीजाण्याकरितां तुळसीदासाच्या मठावरून निघाली. तिनें जातांना तुळशीदासास नमस्कार केला. तेव्हां त्यानें 'सौभाग्यवती भव ' असा आशिर्वाद दिला तो ऐकून ती स्त्री ह्मणाली—विष्णुभक्ता, माझा नवरा आताच मरण पावला ह्मणून मी सती जात आहें. मग आपला हा

आशीर्वाद खोटा नाहीं का होणार? तुळसीदास ह्मणाला-श्रीरामाचे कृपेकरून माझें वचन खरें होईल. असें ऐकून ती स्त्री त्याला नमस्कार करून पतीजवळ आली तों तिचा नवरा जसा निद्रिस्थ जागा होऊन बसतो त्याप्रमाणें उठून बसला. तेव्हां तिला मोठें नवल वाटलें. नंतर नवऱ्यासह तुळसीदासाचे मठांत येऊन त्याला नमस्कार करती झाली. ही बातमी लोकांस कळतांच हा देवाचा पूर्ण भक्त आहे असें सर्वलोक मानूं लागले.

तुळसीदासाची कीर्ति अकबर राजानें ऐकून, सेवक पाठवून आपल्या घरीं आणवून त्याची षोडशोपचारें पूजा केली व ह्मणाला—मला रामाचें दर्शन करून द्यावें. नाहीं तर मी येथून जाऊं देणार नाहीं. असें संकट तुळसीदासानें जाणून मारुतीचा मनांत धांवा करून, मागितलें कीं, अकबरानें घातलेलें संकट टळावें. तें मारुतीनें ऐकून सर्व वानरांस अकबराच्या राज्यांत जाण्याची आज्ञा दिली. त्याबरोबर सर्व वानर नगरांत गेले व दुष्ट, घातकी यांना नदींत टाकून दिलें. नीच दुर्जन सावकार होते त्याचें द्रव्य हरण करून दरिद्री यांस वांटून टाकिलें. याप्रमाणें सर्व लोकांस वानरांचा त्रास होतांच अकबराचे दरबारीं जाऊन सांगूं लागले. त्या वेळीं सज्जन होते ते ह्मणाले—तुह्मी तुळसीदासाचा छळ केला ह्मणून हा अनर्थ झाला. तेव्हां अकबर तुळसीदासास ह्मणाला, स्वामी हा अनर्थ काय

ह्मणून केला ? तुळसीदास ह्मणाला, तुह्मीं रामाचे दर्शनाची इच्छा दर्शविली ह्मणून त्याचें सैन्य पुढें आलें आहे व राम मागून येत आहेत. राजा नमस्कार घालून ह्मणाला—एवढेंसें सैन्य आलें त्यानें इतकी नासाडी केली मग सर्व सैन्य आल्यावर हस्तिनापुर पालथेंच घालील. तरी कृपा करून हें सैन्य आवरून धरावें. असें बोलतांच सर्व सैन्य गुप्त झालें. पुढें तुळसीदासानें तेथें एक वर्ष राहून सर्व लोकांस भक्तीस लाविलें. नंतर राजाची आज्ञा घेऊन तुळसीदास द्वारकेस जाऊन श्रीकृष्णाचें दर्शन घेता झाला. दुसरा एक प्रियदासनामें भक्त होता त्यानें " संतचरित्र " नांवाचा ग्रंथ केला होता त्याला तुळसीदास भेटून ह्मणाला,—आपला ग्रंथ मला दाखवावा. तें ऐकून प्रियदासानें सर्व संतांचीं चरित्रें वाचलीं, परंतु त्यांत तुळसीदासाचें चरित्र आलें नाहीं. असें श्रीरामचंद्रांनीं जाणून, त्या ग्रं . . तुळसीदासाचें चरित्र आपल्या हातानें लिहिलें. तें स . . . . क मोठ्या प्रेमानें पठण करूं लागले.

---

## गोष्ट ४ थी.

### नामदेव.

श्रीक्षेत्र पंढरपुर येथें दामाशेटी नांवाचा शिंपी भक्त . . त असे. तो दररोज विठ्ठलाची पूजा करून देवास नैवेद्य दाखवून नंतर भोजन करीत असे. त्याची गोणाई

नांवाची स्त्री एके दिवशीं दामाशेटीस ह्मणाली–आपण विठोबाचे भक्त असून आपल्यास पुत्रसंतान नाहीं तरी त्याचे जवळ वर मागावा. दामाशेटी ह्मणाला–आपण आतां वृद्ध झालों; आपणांस संतान कसें वरें होईल ? गोणाई म्हणाली, कां वरें ? त्याच्या सामर्थ्यानें मगळें कांहीं होईल. ज्या देवानें समुद्रावर पाषाण तारिले, ब्रम्हदेवानें गाई व गोपाळ चोरून नेले त्या वेळीं आपणच गाई व गोपाळ होऊन आला ! असें जर त्याचें कौतुक आहे; तर मग आपणांस पुत्र देण्यास त्याला कोणती हरकत आहे. असें बायकोचें भाषण ऐकून दुसरे दिवशीं दामाशेटीनें देवळांत जाऊन पुत्रसंतानाबद्दल देवाची प्रार्थना केली. त्याच रात्रीं देव दामाशेटीच्या स्वप्नांत जाऊन म्हणाले, “ तूं उद्यां चंद्रभागेवर स्नानास जाशील तेव्हां वरून एक मुलगा वाहत येईल तो घेऊन त्वां त्याचें पालन पोषण करावें. ” स्वप्न पाहून आनंदित होत्साता आपले बायकोजवळ तें सांगता झाला. दुसरे दिवशीं स्नानास गेला असतां वरून वहात येत असलेला शिंपला धरून घरीं घेऊन आला व उघडून पाहतो तों आंत पुत्ररत्न निघालें; त्याला गोणाईनें स्तनाशीं धरतांच गोणाईला पान्हा फुटला. त्याचें नांव नामदेव असें ठेविलें. तो दिवसेंदिवस मोठा होत चालला असतां एके दिवशीं दामाशेटी बाजारांत जाणयकरितां निघाला त्या-

वेळीं नामदेवास ह्मणाली,-तूं देवाची पुजा करून, नैवेद्य दा-खवून नंतर जेवावयास ये. असें सांगुन तो निघुन गेला. दुसरे दिवशीं नामा पूजासामग्री व नैवेद्य घेऊन. देवळांत गेला. आणि पजा करून देवापुढें नैवेद्य ठेवून ह्मणाला—देवा, आतां नैवेद्य भक्षण करावा. मला येंण्यास उशीर लागला त्याची माफी करा. नाहीं तर प्राण देईन. देवानीं त्याचा एक निश्चय पाहून नैवेद्य भक्षण करून ह्मणाले, पण हें कोणाज-वळ सांगुं नको हां ! नंतर नामा घरीं आला त्याला गोणाई ह्मणाली नाम्या नैवेद्य कोठें आहे ? नामा बोलला-देवांनीं भक्षण केला. गोणाई—अरे देवानें नैवेद्य कसा खाल्ला ? पुढें ती हकीगत दामाशेटी आल्यावर त्याला सांगितली ती ऐकून दामाशेटी ह्मणाला, उद्यां नामा व मी देवळांत जाऊं. सकाळीं दामाशेटी नामदेवास बरोबर घेऊन देवळांत जा-ऊन पुजा झाल्यावर नामदेव देवास ह्मणाले-देवा आतां नैवेद्य भक्षण करा. देव ह्मणाले—अरे, तुझा बाप आला आहे ना ? नामदेव बोलला—मग काय झालें ? तर मग देवा, तुं कपटी आहेस, अशानें तुझा नाममहिमा वाढणार नाहीं. असें नामदेवाचें भाषण ऐकून देवांनीं नैवेद्य भक्षण केला. नंतर घरीं येऊन दामाशेटीनें गोणाईस हकीगत सांगितली. पुढें नामदेवाचें लग्न केलें. त्याच्या बायकोचें नांव राजाबाई असें होतें. कांहीं दिवसांनीं नामदेवास पुत्र झाला; त्याच्या बारशाकरितां देव स्वतः साडी चो-

ठी व आंगडें टोपरें यांचा अहेर घेऊन आले. तेव्हां गोणाई देवास ह्मणाली, या मुलाचें नांव काय ठेवूं ? देव ह्मणाले 'नारायण' असें ठेवावें. नंतर देव देवळांत आले. पुढें नामदेव दररोज देवळांत जाऊन कीर्तन करूं लागला. असें गोणाईनें पाहून ह्मणाली अरे नामदेवा, तूं आपला प्रपंच टाकून दररोज देवळांत जाऊन बसतोस, मग पुढें आपला निभाव कसा लागेल. असें आईचें भाषण ऐकून नामदेव देवाजवळ जाऊन ह्मणाला, त्वां मला संसारांत कशाला घातलेंस ? देव ह्मणाले नाम्या तुला आज कोणीं गांजलें ? नामदेव बोलला–माझ्या आईनें. देव ह्मणाले तर मग तूं माझ्या जवळच राहा ह्मणजे मी तुला संसारबाधा होऊं देणार नाहीं. नामदेव बोलला–हें ज्ञान मला नको सांगूं. तुझ्या नामाच्या योगें करून संसारदुःख नाहींसें होतें, मग तूं जवळ असतांना प्रपंचबाधा कां बरें होते ? तूं देव व मी भक्त ! तुझें मी निरंतर कीर्तन करीन. तरी मला वर द्यावा. असें ऐकून नामदेवास पोटाशीं धरून देव ह्मणाले–तुझ्या घरची नांवणूक कशी आहे ती मनांत संशय न धरितां सांग. नामदेव बोलला–देवा तुझ्या घरीं ज्या अष्टनाग्री दासी आहेत, त्याच आमचे घरीं उंदीर घुशी होत. तुह्मास शेषाचें आंथरूण आहे; पण आम्हांस गवत सुद्धां मिळत नाहीं. असें ऐकतांच देवास हांसूं आलें.

इकडे नामदेवाची स्त्री चिंताक्रांत बसली असतां, मनांत ह्मणाली, नवरा देवाची भक्ति करितो, पण त्या देवानेंच आ- ह्मांस दरिद्र आणलें ! अशाप्रकारें तिचें मनोगत देवांनीं जाणू- न गरुडास बैल करून, आपण केशवशेटी होऊन, द्रव्याच्या गोणी बैलावर टाकून, नामदेवाचे आंगणांत आले व हांक मारली. ती ऐकतांच राजाई आपणाशीं ह्मणाली या मेल्या पाहुण्यानीं तर त्रास दिला आहे. घरांत तीळभर सुद्धां अन्न नाहीं, आणि यांना काय घालूं ? तिचे मनांतील हेतु देवां- नीं जाणून राजाईस बाहेर हांक मारली व नामदेवाची वि- चारपूस करूं लागले. तेव्हां राजाई आपण कोण कोठचे ह्म- णून प्रश्न करती झाली. केशवशेटी ह्मणाले–मी नामदेवाचा मित्र असून त्याचें दारिद्र्य ऐकून त्याच्या करितां द्रव्य घे- ऊन आलों आहें. असें ऐकिल्याबरोबर राजाईनें बसावयास आसन दिलें व बोलूं लागली. तेव्हां देव ह्मणाले ह्मण आहे कीं, कोरड्या हातानें कोणाचे घरीं जाऊं नये. पहा ! सु- दाम्यानेंही मजकरितां मूठभर पोहे आणले होते. नंतर राजा- ईस ह्मणाले–हें द्रव्य नेऊन घरांत ठेव. आजपासून नामदे- वाला छळूं नको. असें राजाईला सांगून देव राउळांत येऊन रुक्मिणीस हकीगत सांगते झाले.

इकडे राजाई आनंदित होऊन द्रव्य घरांत ठेवून त्यांतील ओंटीभर होन घेऊन वाण्याचे दुकानीं जाऊन

डाळ तांदूळ वगैरे सामुग्री घेऊन आली व स्वयंपाकास लागली. गोणाई मनांत ह्मणाली, नामा रुसून गेला आहे त्याला जाऊन आणावा. असा विचार करून देवळांत जाऊन देवाजवळ भांडूं लागली. तेव्हां देव मनांत ह्मणाले, ही माझी कीर्ति बुडवील. असें जाणून गोणाईस बोलले-अगे, तुझें भाग्य थोर ह्मणून असा पुत्र तुझ्या पोटीं आला. जसा दैत्यवंशांत प्रल्हाद जन्मला तसाच हा तुझ्या पोटीं विष्णुभक्त निर्माण झाला आहे. गोणाई असें ऐकून ह्मणाली-देवा, तुझ्या भजनीं प्रेमा असूं दे, पण माझा नामा मला दे. नाहींतर तुझी अन्न गाहणार नाहीं. देव ह्मणाले—तं आपल्या नाम्याला घेऊन जा. उगाच आमच्यावर निमित्त नको. नंतर गोणाई नामदेवास घेऊन घरीं आली, तों राजाई स्वयंपाक करण्यांत गुंतली आहे व द्रव्याच्या गोणी घरांत पडल्या आहेत; असें पाहून नामदेव आईस ह्मणाला—हें द्रव्य कोठून आणलेंत ? गोणाई बोलली-मला माहीत नाहीं. पुढें बायकोस विचारूं लागला, तिणेंही सांगितलें नाहीं. नंतर जनाबाई जवळ येऊन ह्मणाली, राजाई चिंताक्रांत बसली असतां देवांनीं केशवशेटीचें स्वरूप धारण करून, बैलावरून गोणी आणून दिल्या व हें सरल्यावर दुसरें आणून देईन, पण नामदेवाची छळणा करूं नको असें सांगून गेले. हें जनाबाईचें बोलणें ऐकून

नामदेवास गहिंवर येऊन, डोळ्यांस आसवें आणून ह्मणाला-हे करुणाकरा! मजसाठीं केशवशेटी होऊन श्रम घेतलेत! असें बोलून गांवचे ब्राह्मणांस बोलावून सर्व द्रव्य वांटून टाकलें व विदेही होऊन देवाचें भजन करीत राहिला.

---

## गोष्ट ५ वी.

### कबीर.

महाक्षेत्र काशीयेथें तमाल मोमीन नांवाचा एक प्रेमळ भक्त रहात असे. तो एके दिवशीं सूत धुण्याकरितां नदीवर गेला असतां नदींतून वाहत येत असलेला एक शिंपला त्याचे दृष्टीस पडला. तो उचलून पाहतां एक सुंदर बाळक त्यांतून निघालें. तें धोतरांत गुंडाळून घरीं घेऊन आला व बायकोजवळ दिलें; तों तिच्या स्तनास पान्हा फुटला. त्याचें नांव कबीर असें ठेविलें. त्या मुलास पाहतांच सर्व लोकांस आश्चर्य वाटून ह्मणाले—तमाल मोमीन महाभक्त ह्मणून असा पुत्र त्यास मिळाला. तो मोठा झाल्यावर त्याचें लग्न केलें. कबीर हा लहानपणापासून भजन करीत असे. त्यामुळें त्याचें चित्त घरीं नरहतें ह्मणून लोक त्याला हांसत असत. तेव्हां कबीरानें विचार केला कीं, पांजणी तयार करून कापड विणीत बसावें. नंतर कापड विणीत असतां त्याचें ध्यान श्रीराममूर्तीकडे असे. त्यावेळीं कबीराची आई जवळ येऊन त्यास मारावयास आई;

तेव्हां पुन: सावध होऊन विणावयास लागे. असें देवांनीं जाणून मनांत ह्मणाले कबीर माझ्या ध्यानीं लागतो ह्मणून आई त्यास मारते, तरी तेथें आपण जाऊन विणावयास लागावें; असा विचार करून देव विणावयास जात असत. याप्रमाणें देवानें व कबीरानें तो शेला पुरा करून आईजवळ नेऊन दिला. आई ह्मणाली—तो बाजारांत नेऊन विकून द्रव्य घेऊन ये. नंतर कबीर तो शेला घेऊन बाजारांत मांडून विदेही होऊन भजन करीत राहिला. बाजारांत जीं जीं गिराइकें येत तीं तो शेला पाहून ह्मणत कीं, याचें मोल आमच्यानें देववणार नाहीं. व आमचे जवळ द्रव्यही नाहीं. असें ह्मणून न विचारतां फिरून जात. संध्याकाळ झाली तेव्हां कबीर मनांत ह्मणाला—शेल्यास गिराईक कोणी नाहीं; आतां मी असाच घरीं गेलों तर आई मला मारील. याकरितां कोठें तरी जाऊन बसावें. असा विचार करून, एका पडक्या घरांत जागा पाहून भजन करीत बसला. असें देवांनीं जाणून त्याचें सत्व पाहण्याकरितां वृद्ध ब्राह्मणाचें रूप धरून कबीराजवळ येऊन ह्मणाले—मी दरिद्री ब्राह्मण थंडीनें सुडसुडत आहें तरी कांहीं वस्त्र द्यावें. असें कबीरानें ऐकतांच मनांत ह्मणाला आतां आपलें सत्व जाईल; असें समजून अर्धा शेला त्यास फाडून दिला. देव पुनः बाहेर येऊन ह्मणाले—आतां फकीरवेषानें सत्व पहावें. ह्मणून फकीराच्या वेषानें यऊन मागा-

वयास गेले तेव्हां अर्धा राहिलेला शेला फकीरास दिला. नंतर तेथून ब्राह्मणाचा वेष घेऊन कबीराचे आईजवळ जाऊन सर्व हकीगत सांगितली. तेव्हां आई ह्मणाली–तो आतां घरीं आला ह्मणजे त्याला मार देतें, देव ह्मणाले–तो भजन करीत बसला आहे तो तुझ्या भीतीनें येणार नाहीं; चल तुला दाखवितों. मग कबीराची आई त्या ब्राह्मणरूपी देवाबरोबर कबीराजवळ आली व त्यास शेल्याबद्दल विचारून मारूं लागली. तेव्हां देव ह्मणाले—तुझ्या पोटीं माया ह्मणून मारीत नाहींस. माता ह्मणाली—येथें मारावयास कांहीं साधन नाहीं. मग देवांनीं आपली काठी तिला दिली. त्या काठीनें मारूं लागली परंतु त्यावेळीं असा चमत्कार झाला कीं, कबीर विदेही असल्या कारणानें त्याला कांहींच मार न लागतां देवाचे पाठीवर वळ उठले; तेव्हां देवांनीं पुरे कर ह्मणून सांगितलें आणि ब्राह्मणवेष टाकून सीतेसहित रामांनीं स्वरूप प्रगट केलें. त्या बरोबर कबीरानें लोटांगण घातलें व देव कबीराचे मातेस भेटून ह्मणाले—तुझें भाग्य थोर ह्मणून असा पुत्र तुझ्या उदरीं आला. श्रीरामाचें दर्शन पुत्रपुण्याईनें झालें असें कबीरमातेनें जाणून आनंदित होत्साती, कबीरास घेऊन घरीं आली. इकडे राम अदृश्य झाले.

---

# गोष्ट ६ वी.

## कमाल.

कबीराचे आईस रामदर्शन झाल्यापासून तीही प्रेमानें भजन करीत राहिली आणि कबीर व त्याची कांता एकविचारें वागत असत. पुढें कबीरास एक पुत्र झाला त्याचें नांव कमाल असें ठेविलें. तोही आपल्या बापाचें पाहून भजन करूं लागला. कमाल सात वर्षांचा झाला तेव्हां द्वारकेस जाण्याकरितां बापाजवळ आज्ञा मागूं लागला. ती कबीरानें मान्य करून जाण्यास सांगितलें. त्यावरोबर कमाल तीर्थयात्रेस निघून द्वारकेस येऊन गोमतीचें स्नान केलें, आणि श्रीकृष्णाचें दर्शन घेतलें. तेथें चार महिने राहून रणछोडजीचें दर्शन घेऊन घरीं येऊन आईबापांस वंदन करिता झाला. आणि ह्मणाला– मी सर्व तीर्थें पाहिलीं. असें मुलाचें वचन ऐकून त्यास आलिंगन देऊन दोघेही भजन करीत राहिले.

पुढें कोणे एके दिवशीं कबीराचे घरीं संत आले. त्यास लोटांगणें घालून बसावयास आसनें दिलीं आणि कबीर बायकोस ह्मणाला—संतांकरितां पाकसिद्धी लवकर तयार कर. कांता ह्मणाली—आपल्या घरांत तीळभरसुद्धां अन्न नाहीं, मग भोजन कसें बरें करूं ! तुह्मीं आणि कमाल चोरी करण्यास जा. असें बायकोचें वचन ऐकून

कबीर एक तरवार बरोबर घेऊन कमालासह वाण्याचें दुकान फोडण्याकरितां निघाले. त्यांनीं दुकान फोडलें व कमाल आंत गेला आणि तूप, गूळ, साखर इत्यादि बाहेर कबिराजवळ देऊन वाण्यास जागें करून पळूं लागला. तोंच वाणी जागा होऊन कमालाचे दोनीं पाय भिंगच्या मागें धरले. त्याबरोबर कमाल बापास ह्मणाला—आतां वाणी सर्वांस बोलावून आपल्यास धरील तरी माझें शीर कापून घेऊन घरीं नेऊन ठेवा आणि संतांस भोजन घालून तृप्त करा. असें मुलाचें प्रेमयुक्त भाषण ऐकून कबीरानें शीर कापून घेऊन घरीं जाऊन शीर देऊन बायकोस वृत्तांत कळविला. तेव्हां ती रडून करून ह्मणाली—कमाला ! त्वां संतकारणीं देह लावून वंशाचा उद्धार केलास ! नंतर शोक आवरून स्वयंपाक करून संतांस भोजन घातलें आणि त्यांना निजावयास सांगितलें व कबीर त्यांची सेवा करूं लागला. सूर्योदय होतांच सर्व संत स्नानाकरितां नदीवर गेले.

इकडे त्या वाण्यानें मोठ्यानें ओरडून सर्वांस जागें केलें. ते लोक येऊन पाहतात तों त्या चोरास शीर नाहीं. ह्मणून तो वाणी राजाचे दरबारीं जाऊन कळविता झाला. त्याबरोबर राजास क्रोध येऊन त्या चोरास शूळावर देण्याची सेवकांस आज्ञा केली. तेव्हां त्यांनीं कमालास शूळावर नेऊन दिलें. तिकडे संतांनीं स्नानं करून कबीराची आज्ञा घेऊन तीर्थास

आण्यास निघाले. त्यांना कबीर पांचवीत पांचवीत नगराबाहेर आला. तों तेथें शिराशिवाय धड शूळावर दिलेलें संतांच्या दृष्टीस पडलें. तें पाहात ते तेथें उभे राहिले. तों असा चमत्कार झाला कीं, त्या शूळावरील धडानें संतांस नमस्कार केला. तेव्हां संत कबीरास विचारूं लागले. कबीर ह्मणाला—हा चोर वैष्णव असून तुमच्यावर त्याचा हेतु होता; ह्मणून नमस्कार करण्याकरितां त्यानें प्राण ठेविला होता. त्यावर संत ह्मणाले—तो चोर कोण होता बरें ? असें ऐकतांच कबीरानें सर्व हकीगत सांगितली. तेव्हां संत ह्मणाले—त्याचें शीर कोठें आहे तें घेऊन ये. तसाच कबीर घरीं येऊन शीर घेऊन आला; मग संतांनीं तें धड शूळावरून खालीं उतरून त्याला शीर लावतांच कमाल सावध होऊन नमस्कार करता झाला. तें कौतुक पाहून सर्व जन हा ईश्वरी अवतार आहे असें समजुन त्यास नमस्कार करूं लागले.

---

## गोष्ट ७ वी.

### कबीरानें गुरु केला.

एके दिवशीं रात्रीं कबीर बाजारांत जाऊन भजन करीत असतां एक बाणोण वृळण वृळीत होती. तें पाहून रुदन करूं लागला. तेव्हां लोक त्यास तूं कां रडतोस ह्मणून विचारूं लागले. तो त्यांस ह्मणाला—माझे दुःखाचें निवारण तुमच्यानें होणार नाहीं. इतक्यांत निपटनिरंजन

नांवाचा एक साधु तेथें येऊन कबीरास ह्मणाला-तूं येथें कां रडत आहेस ? कबीर नेत्र उघडून पाहतो तों ज्ञानसागर निपटनिरंजन जवळ उभा आहे असें पाहिलें, त्यास ह्मणाला-मी रडतों याचें कारण हेंच कीं, हें जें जातें फिरून कण बाहेर येत आहेत तशीच माझी गती होईल. नंतर निपटनिरंजन ह्मणाला-तुझें ध्यान रामभजनीं आहे तर तुला काळाचेंही भय नाहीं. असें बोलून एकमेकांस आलिंगन देऊन जाते झाले.

पुढें एकेदिवशीं कबीरानें गुरु करण्याचा निश्चय केला. व रामानंद स्वामी संन्यासी यांचे चरणीं लागला. आणि ह्मणाला-महाराज, मजवर कृपा करून अनुग्रह द्यावा. स्वामी बोलला-तूं यवनज्ञातींत जन्मला असल्या कारणानें तुला अनुग्रह देण्यास आह्मांस अधिकार नाहीं. असें ऐकून कबीर घरीं गेला आणि विचार केला कीं, स्वामीच्या मार्गावर जाऊन बसावें. नंतर स्वामी स्नान करावयास जाण्याच्या मार्गावर एक खळगा खणून त्यांत राम राम करीत बसला. चार घटका रात्रीस स्वामी स्नान करण्याकरितां गंगेवर निघाले. तों अंधारांत स्वामीचा पाय कबीराचे मस्तकास लागला. तेव्हां स्वामी ह्मणाले—येथें राम राम कोण करीत आहे व माझा पाय कोणास बरें लागला. असें ऐकताच कबीर हात जोडून स्वामींची प्रार्थना करूं लागला. स्वामी ह्मणाले—तुजसारखा एकनिष्ठ भक्त नाहीं, असें बोलून

गंगेवर स्नानास गेला. नंतर कबीर तेथून घरीं आला. पुढें एकेदिवशीं कबीर बाजारांत भजन करीत असतां माझा गुरु रामानंद स्वामी असें लोकांस सांगूं लागला. तें ऐकून रामानंद क्रोधानें ह्मणाला–अरे ! मी तुला उपदेश केव्हां दिला ? असें बोलून मस्तकावर लाथ मारली त्याबरोबर कपाळांतुन रक्त वाहूं लागलें. तें पाहून कबीरास आनंद होऊन ह्मणाला--मागच्या गोष्टीस कोणी साक्ष नव्हतें ह्मणून मला लोक वाईट बोलले; आतां तरी प्रत्यक्ष पाहा. असें लोकांस सांगू लागला; तें स्वामींनीं ऐकून त्याचे मस्तकावर हात ठेवून बोलले. तुझी निष्ठा पाहण्याकरितांच हें कृत्य केलें. स्वामींचें हें वचन ऐकून कबीरास आनंद वाटून प्रेमानें कवित्तें गाऊं लागला.

पुढें एकदिवशीं कांहीं दुष्ट लोकांनीं कबीरास बाहेर घालविण्याचा विचार केला आणि सर्व संतांस कबीराचे घरीं येण्याबद्दल पत्रें पाठविलीं. त्याबरोबर संत कबीराचे घरीं आले. त्यांना पाहतांच कबीरास आनंद झाला व निंदक लोक संत आलेले पाहून हंसू लागले. असें संकट देवांनीं जाणून देव आपण कबीराचीं अनंत रूपें घेऊन संतांची सेवा करूं लागले. जिकडे तिकडे कबीर झालेले पाहतांच सर्व जनांस आश्चर्य वाटलें. नंतर सर्व संतांची बोळवण करून देव अदृश्य झाले. तें कौतुक पाहून

निंदक लोक कबीराचे चरणीं लागले. व कबीर भजन करीत राहिला.

## गोष्ट ८ वी.

### ज्ञानेश्वर.

आपेगांवांत गोविंदपंत नांवाचा एक भक्त राहत असे. त्याची निराबाई नांवाची स्त्री भाविक व पतिव्रता होती. तिला एक गुणवान् व भक्तिज्ञानवैराग्यशील असा पुत्र झाला. त्याचें नांव विठोबा असें ठेविलें. तो मोठा झाल्यावर वडिलांस ह्मणाला—मला तीर्थास जाण्यास आज्ञा द्यावी. वडिलांची आज्ञा घेऊन तीर्थें करीत करीत अलकावतीस येऊन स्नान करून देवपूजा करीत बसला असतां तेथें शिधोपंत येऊन या ब्रह्मचाऱ्यास पाहतांच नमस्कार घातला. व तुमचें नांव गांव काय ह्मणून विचारूं लागला. विठोबा ह्मणाला—मी आपेगांवचा राहणारा असून माझीं आईबापें वृद्ध असून, मी तीर्थें करीत येथें आलों आहें. असें शिधोपंतानें ऐकून त्याला आपल्या घरीं नेलें. व आपणही झोंपीं गेला. रात्रो पंढरीनाथ शिधोपंताच्या स्वप्नांत जाऊन ह्मणाले—ह्या ब्रह्मचाऱ्यास आपली कन्या दान करावी. असें स्वप्न पाहून मनांत संतोषून विठोबास कळविलें. तेव्हां विठोबा ह्मणाला आम्हांस पंढरीनाथाची आज्ञा नाहीं. शिधोपंत ह्मणाले आपण आजच्या दिवस येथें राहा ह्मणजे देव स्वप्नांत येऊन

मागतील. रात्रीं त्यानें वृंदावनाचे ठिकाणीं शयन केलें. तों पंढरीनाथ स्वप्नांत येऊन ह्मणाले—चारी अवतार मूर्तिमंत तुझ्या पोटीं येतील तर कन्यादान पदरीं घ्यावें. असें स्वप्न पाहून उठून वमला व शिधोपंतास सर्व वृत्तांत सांगितला. मग त्यानें लग्नाची सामुग्री तयार करून त्याचें लग्न लावून दिलें. नंतर आषाढमासीं विठोबा आपलें कुटुंब घेऊन पंढरीस आला व चंद्रभागेचें स्नान करून पांडुरंगाचें दर्शन घेतलें. तेथून रामेश्वरास तीर्थें करीत जाऊन, कोल्हापुरीं येऊन, पंचगंगेचें स्नान करून लक्ष्मीचें दर्शन घेतलें. पुढें कृष्णातीरीं माहुलीसंगमीं स्नान करता झाला. नंतर तेथून अलकावतीस परत आला. तेथें शिधोपंताला भेटून साष्टांगनमस्कार घालून चार रात्री तेथें राहिला व आईबापांच्या भेटीस जाण्याचा हेतु सासऱ्यास कळविला. तेव्हां शिधोपंत ह्मणाला—आपल्या स्त्रीसहवर्तमान तुमच्या वडिलांच्या भेटीस आह्मीही येतों. ती गोष्ट विठोबास पसंत पडून सर्वजणें आपेगांवास येऊन गोविंदपंतांस भेटून शिधोपंतानें सर्व हकीगत कळविली. ती ऐकून निराबाईस व गोविंदपंतांस मोठा आनंद झाला. त्या वृद्धांस शिधोपंतानें वस्त्रालंकार दिले व त्यांची आज्ञा घेऊन आळंदीस परत आला. पुढें कांहीं दिवसांनीं विठोबाचीं आईबापें परलोकवासी झालीं, ती हकीगत शिधोपंतास कळतांच आव-

पाच्या भेटीस आला व ह्मणाला- तुम्हीं तर विरक्त झाले आहांत आणि संसारास सर्व कांहीं पाहिजे. तरी तुम्हीं अलकापुरीस चला. असें सासऱ्याचें वचन ऐकून आपल्या स्त्रीसह अलकावतीस आला. तेथें नहमीं त्यास हरिकीर्तन व साधुदर्शन होत असे त्यायोगें मोठें समाधान वाटे. तो आषाढी कार्तिकीच वारीस पंढरीस जात असे. असे कांहीं दिवस गेले, परंतु पोटीं कांहीं संतान होईना. त्यामुळें त्याचें मन उदास होऊन बायकोस ( रखुमाईस ) ह्मणाला-माझ्या मनांत संन्यास ग्रहण करण्याकरितां वाराणसीस जावें असें वाटतें, तरी जाण्यास आज्ञा दे. असें पतीचें वचन ऐकतांच रखुमाई कांहीं न बोलतां बापास सांगती झाली. शिधोपंत म्हणाला- मुली, पोटीं पुत्रसंतान नसतां संन्यास ग्रहण करूं नये असें वेदाचें वचन आहे. तरी तूं त्यास जाण्यास आज्ञा देऊं नको. असें बापाचें वचन ऐकून तिनें त्यास आज्ञा दिली नाहीं.

पुढें एके दिवशीं विठोबानें गंगेवर स्नानास जाण्याविषयीं बायको जवळ आज्ञा मागितली. परंतु तिणें न जाणून जाण्यास आज्ञा दिली. ती ऐकून त्यास समाधान वाटून आनंदवनास आला. तेथून वाराणसीस त्रिवेणीसंगमीं स्नान करून माधवपूजा केली व माघस्नान प्रयागाचे ठिकाणीं करून तेथून मार्गें पुष्करास आला. तेथें साधुसंतांच्या मुखें गीतेचा अर्थ व संन्यासप्रकार ऐकून मनांत विचार

केला कीं, हा दुस्तर संसार टाकून संन्यासदीक्षा घ्यावी. नंतर एका रामाश्रम संन्याशास शरण जाऊन संन्यासदीक्षा देण्याबद्दल प्रार्थना करूं लागला. तेव्हां त्या संन्याशानें तुझा कुटुंबपरिवार किती आहे ह्मणून प्रश्न केला. विठोबा ह्मणाला—माझें दुसरें कोणी नाहीं, मी एकटाच आहें. असा तो विरक्त पाहून सद्गुरूनें त्यास मंत्रोपदेश केला. ही वार्ता त्याचा सासरा शिधोपंत यास कळून विठोबाच्या बायकोसही कळली. तेव्हां ती चिंताक्रांत होऊन रडूं लागली. मग आईबापांनीं तिचें समाधान केलें. तेव्हांपासून तिणें या संसारांत जन्माचें सार्थक करावें ह्या हेतूनें पिंपळाची सेवा आरंभिली. त्यामुळें तिच्यादोषांचें निर्दळण झालें. एके दिवशीं रखुमाई पिंपळाच्या सेवेंत असतां रामानंदस्वामी संन्यासी चालले होते त्यांस नमस्कार केला. रामानंदांनीं " अष्टपुत्रासौभाग्यवती हो " असा आशीर्वाद दिला. तो ऐकून तिला मोठें आश्चर्य वाटून हांसूं आलें. रामानंद ह्मणाले—हे माते, तुला विनोद कां बरें वाटला? रखुमाई ह्मणाली—आपण मला आशीर्वाद दिला तो पतीशिवाय सफल कसा होईल? माझ्या पतीनें संन्यास ग्रहण केला आहे. म्हणून मला तुमच्या आशीर्वादाचा विनोद वाटला. असें रखुमाईचें भाषण ऐकून रामानंद म्हणाले, ज्याणें त्यास संन्यास दिला आहे त्यास प्रायश्चित्त घ्यावें लागेल. तरुण बायको संतानाशिवाय असून

लिला टाकून जो संन्यास घेईल व देईल त्या गुरुशिष्यांस शास्त्रामध्यें दंड सांगितला आहे. असें सांगून रखुमाईस ह्मणाले—बरें तुझे आप्तवर्ग कोणी आहेत कीं नाहींत ? रखुमाईनें उत्तर दिलें, माझीं आईबापें बहीणभाऊ सर्व आहेत, परंतु पतिवांचून मी अशी दीनवाणी दिसत आहें. रामानंद ह्मणाले—तूं आपल्या बापाला येथें बोलावून आण. नंतर रखुमाईनें बापास बोलावून आणतांच रामानंदाची व त्याची भेट झाली. रखुमाईच्या बापानें त्याची षोडशोपचारें पूजा वगैरे करून आपण आलेत कोठून व जाणें कोठपर्यंत आहे असा प्रश्न केला. तेव्हां तो बोलला—मी काशीहून रामेश्वराच्या यात्रेस चाललों होतों तों तुमच्या कन्येनें झालेली हकीगत मला कळविली. तरी आतां तुह्मीं या कन्येस बरोबर घेऊन वाराणशीस जा. मीही परत तुमच्या पाठोपाठ येतों. रामानंदाची अशी आज्ञा होतांच रखुमाईचा बाप मुलीला बरोबर घेऊन वाराणशीस ( काशीस आला. ) रामानंद चैतन्याजवळ ( विठोबाजवळ ) जाऊन ह्मणाले—अरे तूं संन्यासग्रहण केलेंस तरी तुला कांता होती कीं नाहीं; हें खरें सांग. चैतन्यानें आपण आतां खोटें बोललों तर हा यतीश्वर शाप देईल या भीतीनें कांपत कांपत ह्मणाला—माझी कांता संतानहीन असून तिला मी टाकून आलों हें खरे आहे. असें त्याचें भाषण ऐकून रखुमाईस बोलावून चैतन्यास ह्मणा-

ला–हिचा तूं अंगिकार करून, आपल्या देशास जाऊन आपल्या स्वधर्माप्रमाणें वर्तन कर. कुटिल, निंदक, दुष्ट लोक तुझी निंदा करतील आणि तुझ्या मनांत विकल्प येईल तरी धैर्य सोडूं नको. माझा तुला आशीर्वाद आहे. कांहीं चिंता करूं नको जा. असें सांगतांच चैतन्यानें चरणावर मस्तक ठेवून बायकोस हातीं धरून श्वशुरासह घरीं आला. पुढें गांवांतील लोकांनीं यास दोष ठेवून वाळींत टाकिलें. तेव्हांपासून तो आपल्या स्त्रीसह अरण्यांत खोपट बांधून राहिला व उदरनिर्वाहाकरितां भिक्षा मागून खाऊं लागला. अशीं बारावर्षे गेल्यावर त्यास तीन मुलगे व एक कन्या झाली. प्रथम अवतार शंकराचा, त्याचें नांव निवृत्ति असें ठेविलें. विष्णुचा अवतार तो ज्ञानदेव, ब्रह्मदेवाचा अवतार तो सोपान आणि आदिमाया मुक्ताबाई या नांवानें प्रसिद्ध झालीं. पुढील अध्यायांत ज्ञानदेवलीला वर्णन केली आहे.

## गोष्ट ९ वी.

### ज्ञानदेवलीलावर्णन.

मागील अध्यायांत निवृत्ति, ज्ञानदेव, सोपान व मुक्ताबाई हीं चार मुलें चैतन्यास झालेलीं ऐकून गांवांतील लोक म्हणूं लागले कीं, हीं सन्याशाचे पोटीं झालेलीं मुलें यांचीं तोंडें सुद्धां पाहूं नये. तीं मुलें मोठीं झाल्यावर आईबापास

घेना पडून, रखमाई अनागम ह्मणाली—आतां झाल्या अपराधाची क्षमा मागून ब्राह्मणांकडून मुलांचीं मौंजीबंधनें करावीं. असें बायकोचें भाषण ऐकून चैतन्यानें सर्व ब्राह्मणयातीस बोलावून, हात जोडून ह्मणाला-महाराज, झाल्या अपराधाची क्षमा करून, धर्मपुस्तकांत जी नीति सांगितली असेल ती सांगून आह्मांस प्रायश्चित्त द्यावें. त्यावेळीं वडील पुत्र निवृत्ति ह्मणाला—आह्मां साहीजणांस प्रायश्चित्त काय देतां तें सांगा. ब्राह्मण ह्मणाले—या अपराधाबद्दल चैतन्यानें आपलें शरीर करवतीं घातलें पाहिजे किंवा देहांतशिक्षा भोगिली पाहिजे या शिवाय दुसरा उपाय नाहिं. असें चैतन्यानें ऐकून मनांत अनुताप धरून पुत्रांस व बायकोस टाकून एकटाच चालता झाला. नंतर निवृत्ति ह्मणाले-आतां आमची गती कशी काय? शास्त्रांत कोणता दंड सांगितला आहे. ब्राह्मण बोलले-तुह्मीं पैठणक्षेत्रीं जाऊन शुद्धिपत्र घेऊन या. असें ऐकतांच निवृत्ति ह्मणाले आह्मीं पैठणांत जातों; परंतु तेथें आमचें कुल, गोत, जात विचारल्यास आह्मीं काय सांगावें. यावर ब्राह्मण कांहींच बोलत नाहींत असें ज्ञानदेवानें जाणून ह्मणाले—विधिकर्माविरुद्ध जो मनुष्य चालतो त्यास दूषण आहे असें शास्त्रांत सांगितलें आहे. जरी प्राणी जीवन्मुक्त झाला तरी आपलें स्वकर्माचरण त्यानें कधींही सोडूं नये,

ज्याणें त्याणें आपल्या स्वधर्माप्रमाणें चालावें असें वेदामध्यें सांगितलें आहे. नंतर सोपान ह्मणाले—अहो यातीकुळास कोण विचारतो. भक्तीशिवाय श्रीहरीचे चरण कधींही प्राप्त होणार नाहींत. पूर्वी दुर्वास, वसिष्ठ, गोतम, व्यास, वाल्मीक, अगस्ती इत्यादि ऋषींचें उत्तम व कनिष्ठ कुळ कोणत्या शास्त्रांत वर्णन केलें आहे. जरी उत्तम कुळांत जन्मून त्यानें वेदाध्ययन केलें तरी तो भक्तीशिवाय व्यर्थ गेला असें समजावें. अशांप्रकारें तिघांचा संवाद होऊन त्या ब्राह्मणांस नमस्कार करून पैठणक्षेत्रीं आले. तेथील ब्राह्मणांची सभा करून आपली हकीगत त्यांस कळविली. तेव्हां ब्राह्मण ह्मणाले—हे संन्याशाचे मुलगे यांना प्रायश्चित्त घालावयाचें नाहीं. जर शूद्राला गंगास्नान घातलें तर तो ब्राह्मण होईल काय ? नाहीं. तद्वत यांना प्रायश्चित्त उपयोगी नाहीं. यांनीं श्रीहरीला शरण जाऊन सर्वांभूतीं सारखें भजन करावें. बैल, गाढव, हत्ती, कुत्रा यांस समसमान वंदन केलें पाहिजे. ब्राह्मण आणि चांडाल यांना ब्रह्मभाव धरून सारखाच नमस्कार केला पाहिजे. असें त्या ब्राह्मणांचें वचन एकतांच निवृत्ति, ज्ञानदेव, सोपान व मुक्ताबाई यांस परमानंद वाटला. तीं ह्मणालीं—आमच्या मनांत असें होतें तसेंच झालें. नंतर त्या चौघांचीं नांवें ऐकून सर्व जनांस आनंद वाटून ज्ञानदेवास ह्मणाले—तुह्मांस आह्मीं ज्ञानदेव काय ह्मणून

ह्मणावें ? अशी तुमच्या अंगांत ज्ञानाची कोणती करणी आहे. असा संवाद चालला आहे तोंच समोरून एक पखालीचा रेडा चालला होता, त्यास पाहतांच ब्राम्हण म्हणाले—यास जर ज्ञानदेव असें नाम ठविलें तर काय उपयोग ! ज्ञानदेव म्हणाले—रेड्यांत आणि आमच्यांत किंचित्सुद्धां भेद नाहीं. जसा परमात्मा सर्वांभुतीं सारखा आहे तसाच मीही आहें. ब्राम्हण म्हणाले—ही तुझी वाचाळता गहूंदे. असें बोलून काठी घेऊन त्या रेड्यास मारूं लागले. पाठीवर काठी लागतांच इकडे ज्ञानदेव थरथरां कांपूं लागला व पाठीवर वळ उठले. तें पाहून ब्राम्हण म्हणाले—रेड्यांत व तुझ्यांत भेद नाहीं म्हणतोस, तर मग याच्या मुखानें वेद बोलीवं पाहूं. नंतर ज्ञानदेव रेड्याजवळ येऊन त्याच्या मस्तकावर हात ठेवून म्हणाला—ऋग्वेद बोलून या ब्राह्मणांस संतोषित करावें. अशी आज्ञा होतांच चारी वेद रेड्यानें बोलून दाखविले ते ऐकून ब्राह्मणास मोठें आश्चर्य वाटून ह्मणाले—आजपर्यंत कधीं कानांनीं ऐकिलें नव्हतें तें आज डोळ्यांनीं पाहिलें. अशी करणी ब्रह्मदेवाच्यानें सुद्धां घडणार नाहीं. हे तिन्हीं देवांचे अवतार असून आदिमाया मुक्ताईरूपानें प्रगटली आहे; तरी ज्याप्रमाणें गंगेस विटाळ नाहीं त्याचप्रमाणें यांस कोणत्याही प्रकारचा दोष नाहीं. यांसारखे ब्राह्मण पृथ्वींत कोठेंही पाहिले नाहींत. यावर ज्ञानदेव ह्मणाला—स्वामी

हा तुमच्या चरणाचाच प्रताप आहे. आह्मी अज्ञानी आहों. तेव्हांपासून पैठणचे सर्व लोक त्यांस वश होऊन, धन्य वैष्णवभक्त ह्मणून कीर्ति गाऊं लागले. तेथें गंगास्नान करून पुराणश्रवण व रात्रीं हरिकीर्तन होत असे. पुढें एकेदिवशीं असा चमत्कार झाला कीं, ज्या ब्राम्हणाचे घरीं हे उतरले होते, त्याच्या बापाची श्राद्धतिथी आली. ते दिवशीं गांवांतील सर्व ब्राह्मणांस जेवणाचें आमंत्रण दिलें, परंतु ब्राम्हण बोलूं लागले कीं, तूं संन्याशाचीं पोरें आपल्या येथें ठेविलीं आहेस, याकरितां आम्हीं तुझ्या घरीं जेवणास येणार नाहीं. असें ऐकून तो ब्राह्मण घरीं येऊन चिंताक्रांत होऊन बसला. त्यास चिंताक्रांत पाहून ज्ञानदेव ह्मणाले—आज असे उद्विग्न कां दिसतां ? ब्राह्मण ह्मणाला—आज माझ्या घरीं पितृतिथीकरितां ब्राह्मण कोणीहीं जेवावयास येत नाहींत. ज्ञानदेव ह्मणाला-तूं कांहीं चिंता करूं नको. तुझ्यायेथें प्रत्यक्ष पितरें येऊन जेऊन जातील. असें ज्ञानदेवाचें वचन ऐकून त्या ब्राह्मणास आश्चर्य वाटून स्नानादिक कर्मे आटपून भोजन तयार करून पात्रें वाढिलीं. ज्ञानदेवानें अक्षता टाकून सर्व पितर खालीं बोलावून त्यांची शोडषोपचारें पूजा करून, वस्त्रें भूषणें, अलंकार देऊन, संकल्प सोडून जेवावयास बसविले. जेवण आटोपल्यावर तांबूलादि दक्षिणा देऊन बोळवण केली. ही हकीगत पैठणांतील ब्राह्मणांस कळतांच मोठें

आश्चर्य वाटलें. व आपसांत ह्मणाले—आह्मीं अभिमान धर-ल्याकारणानें ज्ञानदेवानें प्रत्यक्ष पितर आणून जेवविले. नं-तर ब्राह्मणांनीं " हे केवळ मूर्तिमंत जगद्गुरु आहेत. हे तीन देवांचे अवतार असून आदिमाया मुक्ताबाई अवतरली आहे यांस प्रायश्चित्त नको. " असें पत्र लिहून सोपानाचे हातीं दिलें. ज्ञानदेवानें रेड्याचे मस्तकीं हात ठेविला तेव्हांपासून तो रात्रंदिवस वेद बोलूं लागला. तें ज्ञानदेवानें जाणून नि-वृत्तीसी विचार करूं लागला कीं, रेड्याचें ज्ञान अनिवार आहे. हा कर्ममार्ग बुडवून वेदाचे मार्ग गुप्त आहेत ते लोकां-स उघड करून दाखवील. याकरितां यास ब्राह्मणापासून मागून बरोबर न्यावा. असें बोलून ब्राह्मणांस नमस्कार करून रेड्यामागून मार्ग चालूं लागले, तों पैठणांतील सर्व स्त्रीपुरुषें त्यांस अर्धकोसपर्यंत पोंचवीत चालली असतां ज्ञानेश्वर आ-पल्या घरीं जाण्याविषयीं प्रार्थना करूं लागला. तेव्हां तीं स्त्रीपुरुषें नमस्कार करून मागें परत आलीं. निवृत्ती, ज्ञानदेव, सोपान इत्यादि महालय ( येथें महालसा देवी आहे व त्यावेळीं, मोहनीराज साधु तेथें रहात होता. ) क्षेत्रीं येऊन राहिले व प्रव-रा तीर्थांत स्नान करून मोहनीराजाचें दर्शन घेतलें. त्या ठिकाणीं जडमूढ जनांच्या उद्धारासाठीं ज्ञानेश्वरानें गीते-वर टीका केली. नंतर निवृत्ती ज्ञानदेवास ह्मणाले "आपल्या स्वबुद्धीनें अमृतानुभव ग्रंथ करावा " अशी आज्ञा होती

अमृतानुभव ग्रंथ तयार करून आदिमाया महालसा हिचें दर्शन घेऊन घरीं जाण्याकरितां निघाले. मार्ग चालत असतां तोंडानें नामस्मरण करावें व रात्रौ हरिकीर्तन करावें असा त्यांचा क्रम असे. अशाप्रकारें मार्ग क्रमीत असतां आळंदी-जवळील वनांत रेड्यानें ( वेद बोलला तो ) प्राण सोडला. त्यास तेथें वेठी समाधी देऊन, पूजन करून त्यास सिंदूर लेपन करून म्हसोबा असें नांव ठेविलें. ( तें स्थान अद्यापिही आहे ) तेथून आळंदीस जाण्यास निघालीं, तों मुक्ताबाई निवृत्तीस म्हणाली—आपली जन्मभूमी पाहून जाऊं आळंदीस येतांच सर्वांस मोठा आनंद वाटून एकमेकांस क्षेमालिंगनें देऊन. पैठणांत झालेल्या हकीगतीचें पत्र वाचून पाहतांच सर्व लोकांस चमत्कार वाटला व हे तीन देवांचे अवतार आहेत असें वाचतांच सर्व जनांनीं त्यांस साष्टांग दंडवत घातलें. त्यांचें कीर्तन ऐकून हे जगद्गुरु अवतार आहेत असें लोक बोलूं लागले. परंतु त्यांत एक विसोबा चाटी नांवाचा ब्राह्मण होता तो या चौघा जणांची निंदा करीत असे. आणि लोकांस सांगे कीं हे संन्याशाचे मुलगे यांचें तोंड कधींही पाहूं नये, यांची आणि आपली दृष्टादृष्ट झाल्यास ते आपल्या सारखे करतील. तेव्हां एके दिवशीं दुसरा दिवाळीचा सण आला, ते दिवशीं निवृत्ती मुक्ताबाईस म्हणाला—आज आम्हांस उत्तम प्रकारचे मांडे तयार करून घाल. मुक्ताबाईनें बरें

आहे असें सांगून सर्व शिधा सामुग्री तयार करून, कुंभाराचे घरीं मांडे करण्याचें मातीचें भांडें आणण्याकरितां निघाली; तों मार्गांत अकस्मात विसोबा चाटीची गांठ पडली. त्यास पाहतांच मुक्ताबाई एका बाजूनें लपून चालली असतां, विसोबा तिच्या जवळ जाऊन तिला मारून कोठें जातेस ह्मणून विचारूं लागला. त्याचें भाषण ऐकतांच मुक्ताबाई थरथर कांपत कांपत ह्मणाली–कुंभाराचे येथें मांडे भाजण्यासाठीं खापर आणण्याकरितां जात आहें. मुक्ताबाईचें वचन ऐकून विसोबा हांसूं लागला व तिच्या पुढें कुंभाराचे येथें जाऊन त्यास ह्मणाला–"खबरदार हिला खापर देशील तर! तूं माझें न ऐकशील तर माझें तुझेवर जें कर्ज आहे त्याचा आतांच निकाल करून दिला पाहिजे" असें ऐकून तो कुंभार चिंता करीत उगीच बसला. तोंच मुक्ताबाई येऊन खापर मागूं लागली. तेव्हां कुंभार ह्मणाला–बाई, माझेकडे खापर तयार नाहीं; माझा आवा उतरल्यावर घेऊन जा. इतकें ऐकून मुक्ताबाई घरीं येऊन चिंतातुर होऊन रडत बसली. तों ज्ञानेश्वर स्नान करून आले व बहिणीला रडतांना पाहून तिला पोटाशीं धरून कां रडतेस ह्मणून विचारूं लागला. मुक्ताबाई ह्मणाली–मी मांडे भाजण्याकरितां खापर आणण्यास कुंभाराकडे जात असतां, मार्गांत विसोबानें मला मारून कुंभारास खापर देऊं नको असें सांगितलें व

निवृत्तिनाथांनीं मांडे करून घाल अशी आज्ञा दिली आहे· तरी आतां काय उपाय करावा याची काळजी पडली आहे. ज्ञानेश्वर ह्मणाले–त्याचा स्वभाव तसा त्याला आह्मीं काय करावें· तूं कांहीं काळजी करूं नको ( हें बोलणं विसोबा चाटी बाहेर खिडकीजवळ येऊन ऐकत होता. ) नंतर ज्ञानेश्वरानें योगधारणा करून तोंडांतून अग्नीच्या ज्वाळा काढून, मुक्ताबाइस पाठीवर मांडे भाजण्यास सांगितलें. मुक्ताबाईनें लगच सर्व तयारी करून एक क्षण न लागतां ज्ञानेश्वराचे पाठीवर मांडे भाजून तयार केले. हें सर्व कौतुक विसोबा बाहेरून पाहत होता. मांडे तयार होतांच निवृत्ति, ज्ञानदेव, सोपान व मुक्ताबाइ एकत्र बसून " श्रीहरि भोक्ता " ह्मणून ग्रास घेऊं लागलीं तें विसोबानें पाहतांच त्याच्या मनास पश्चात्ताप वाटून ह्मणाला–अरे ! ह्या केवळ ईश्वरमूर्ती आहेत. मी यांचा उगाच छळ केला. तरी आतां यांस शरण जाऊन आपलें स्वहित करून घ्यावें. असा विचार करून, आश्रमांत शिरला व जेवावयास बसलीं होतीं तेथें आला. त्यास पाहतांच ज्ञानदेवानें ताट लपवून ठेविलें. त्या ताटावर विसोबानें बळेंच झडप घालून एक घांस उचलून घेतला. त्याबरोबर ज्ञानेश्वर ह्मणाले–तूं खेचर होशील, सरः मागें हो, मग तोच उपदेश ध्यानांत धरून, दोन्ही हात जोडून चरणावर मस्तक ठेविला. ज्ञानदेवानें त्याचें अंतर जाणून, अभयवर देऊन, असा

पूर्वी नारदाचे दर्शनानें वाल्मीकाचा उद्धार झाला तसें ज्ञानदेवाचे संगतीनें त्यास सात्विकज्ञान प्राप्त झालें. ज्ञानदेव "सर पगता खेचरा" असें बोलला, तेव्हांपासून त्यास विसोबा खेचर असें ह्मणूं लागले.

## गोष्ट १० वी.

### ज्ञानदेवाची व नामदेवाची भेट.

कोणे एके दिवशीं ज्ञानदेव नामदेवाचे भेटीची इच्छा धरून पंढरीस आला व नामदेवाचे मंदिरांत प्रवेश करीत आहे तोंच नामदेव सामोरा येऊन, त्यास कडकडून भेटला. व ह्मणाला-माझें पूर्वजन्मींचें पुण्य होतें ह्मणून तुमचे चरण माझ्या घरास लागले. ज्ञानदेव ह्मणाला-तुझ्या भाग्यास पार नाहीं. कारण तुझ्या सन्निध श्रीपांडुरंग अखंडवास करीत आहे. तूं ज्या कुळांत जन्मलास तें कुळ पवित्र आहे. माझ्या मनांत तुला एक गोष्ट सांगावयाची आहे तरी एकांत स्थानीं चल. नंतर ते दोघेही एकांत ठिकाणीं जाऊन. ज्ञानदेव नामदेवास ह्मणाला—आपण जीवन्मुक्त झालों तर गुरु, देव तीर्थ, भजन हीं कधींही सोडूं नये यासाठीं भूतलावरील तीर्थें तुझ्या समागमें जाऊन पाहावीं अशी इच्छा मनांत धरून मी आलों आहें; परंतु माझा मनोरथ सिद्धीस जाईल कीं नाहीं याचा मोठा संशयच आहे. असें ऐकतांच नामदेव चिंतातुर होऊन म-

नीत ह्मणाला—पंढरीक्षेत्र टाकून तीर्थास जाणें हें मला बरें वाटत नाहीं. असा निश्चय करून ज्ञानदेवास साष्टांग नमस्कार घालून बोलला—महाराज, मी आपल्या स्वाधीन नाहीं, ज्याणें माझें पालनपोषण केलें त्या रुक्मिणीवल्लभाच्या मी आधीन आहें, तरी तुह्मीं त्यांच्याजवळ जाऊन आज्ञा मागा. त्यांची आज्ञा झाल्यास मी तुमचें ह्मणणें कबूल करीन. ज्ञानदेव ह्मणाला—तुझ्या मनांतील अभिप्राय मी जाणला; परंतु तूं व मी दोघे त्याच्याजवळ जाऊन आज्ञा मागूं चल. असा उभयतांचा विचार होऊन गरुडपारीं येऊन लोटांगण घालून अंतरगाभारांत गेले व देवास साष्टांग नमस्कार घातला आणि मनांतील विचार देवास कळविला. तेव्हां देव हांसून ह्मणाले; अरे तूं स्फटिकासारखा निर्मळ असून, साक्षात् आत्मरूप आहेस, मग तीर्थाटन कशास करतोस ? ज्ञानदेव ह्मणाला—देवा, आपण ह्मणतां तें खरें; परंतु नामदेवाची संगत मला घडावी ह्मणून हा प्रयत्न आहे. याचे संगतीचें सुख भोगून देहाचें सार्थक करावें असा मनोदय आहे. असें ऐकून देव नामदेवाकडे पाहत हांसून ह्मणाले—नामदेवा, परब्रह्ममूर्ती ज्ञानदेव तुझ्या संगतीची इच्छा करीत आहे तरी त्याबरोबर जाऊन त्याचा मनोरथ सिद्ध करून लवकर परत ये; परंतु आसनीं, शयनीं, भोजनीं, गमनीं माझा विसर तुला पडूं देऊं नको. असें बोलतांच देवास प्रेमाचा हुंदका येऊन

कंठ सद्गदीन झाला व ज्ञानदेवास ह्मणाला—मी एक तुजजवळ मागणें मागतों त्याची आठवण असावी. तें हें कीं, नामदेव माझ्याकडेपणें लहानाचा मोठा झाला असून आजवर माझा निरंतर प्रेमा आहे; एकवेळ माझी परमप्रिया जी लक्ष्मी तिचा वियोग मला सहन होईल; परंतु याचा वियोग मला बिलकूल सहन होणार नाहीं. याम मी रात्रंदिवस कधींच विसरत नाहीं, तरी याचा चांगल्याप्रकारें जिवापलीकडे सांभाळ करावा. याच्या जन्मापासून याम मी वेगळा केला नव्हता, परंतु तुझ्या भिडेस्तव त्याम पाठवीत आहे. असें बोलतांच देवाचा कंठ सद्गदीन होऊन नेत्र भरून आले नंतर उभयतांनीं देवाचे चरणावर मस्तक ठेवून चंद्रभागेच्या तीरीं आले व स्नानें करून पुंडलिकास प्रदक्षिणा घालून पलीकडील तीरास गेले. येथपर्यंत देवांनीं नामदेवास पोंचवून राउळांत परतले तों रुक्मिणी सुवर्णपात्र घेऊन देवाचे पाय धुण्याकरितां आली व रूपन्याहाळून पाहतां डोळे आसवांनीं भरले आहेत, सर्व आंगास घाम सुटला आहे; असें पाहतांच रुक्मिणी मनांत विस्मय पावून चरणावर मस्तक ठेवून ह्मणाली—महाराज, आपली आज विपरीत अवस्था कां बरें दिसते? देव ह्मणाले—माझा आवडता नामदेव ज्ञानदेव येऊन घेऊन गेला, त्यामुळें त्याच्या वियोगाचें मला दुःख झालें आहे. माझ्या शिवाय त्याम इष्टमित्र सखा सोयरा कोणीच नाहीं;

असें असतां तो आपला प्राण कसा ठेवील. याची मोठी काळजी लागली आहे. रुक्मीण ह्मणाली–त्याच्या मुखीं सदोदित नामस्मरण आहे, त्यायोगें त्यास कोणतीही पीडा होणार नाहीं. देव ह्मणाले–तूं ह्मणतेस तें खरें, परंतु त्याच्या शिवाय मला एक क्षणसुद्धां करमत नाहीं. असें बोलून देव मूर्च्छा येऊन पडले. त्या बरोबर रुक्मिणीही घाबरी झाली. पण तसाच धीर धरून देवास सावध करून भक्तजनांस कळविती झाली. मग पदरानें वारा घालून भक्त देवास ह्मणाले–हे कृपासागरा, आज आपण व्याकूळ कां बरें झालां ? देव ह्मणाले–माझा आवडता भक्त नामा गेल्याकारणानें मला कोणताच पदार्थ आवडत नाहीं. त्यास आलिंगन देऊन भेटावें असें मला वाटतें. त्याला मार्ग चालत असतां शीण झाला असल्यास भूक तहान कोण बरें विचारील ? ही चिंता निरंतर माझ्या पोटीं वसत आहे. असें देवाचें वचन ऐकून भक्तांनीं जयजयकार करून प्रेमभावानें लोटांगणें घातलीं व तेथून गरुडपारीं येऊन प्रेमानें नाचून पुनः नमस्कार करिते झाले. इतक्यांत देव कांहींसे सावध झाले.

इकडे नामदेव मार्ग चालत असतां क्षणोक्षणीं मागें परतून पाहून, देवा, मला कां सोडून दिलेंस, असें बोलत मूर्च्छना येऊन पडला व देवाचा धांवा करून ह्मणाला--हे देवा ! सर्व इष्ट मित्र आप्तबंधु माझा तूंच असून मला

अशा संकटांत कां बरें टाकलेंस ? असें नामदेवाचें वचन ऐकून ज्ञानदेव ह्मणाला—नामदेवा ! प्रेमाचा जिव्हाळा असा जो श्रीपांडुरंग तो तुझ्या हृदयाचे ठिकाणीं असतां तूं व्यर्थ शोक कां करतोस ? नामा बोलला—कांसेला पीतांबर नेसून कटेवर कर ठेवलेली आणि विटेवर उभी राहिलेली सगुणमूर्ति मला दाखवा. तो मला न भेटेल तर माझे प्राण जाऊं पाहात आहेत. असा नामदेवाचा देवाचे ठायीं दृढ निश्चय पाहून ज्ञानदेव ह्मणाला—नामदेवा, तूं आपल्या स्वाधीन भगवानास कोणत्या रीतीनें ठविलास तो मार्ग मला दाखीव. भजन कोणत्या रीतीनें करावें, श्रवण मनन करून कसें वनावें तें कृपा करून सांग. नामदेव चरणावर मस्तक ठेवून ह्मणाला—मी अज्ञान बालक ह्मणून देवांनीं तुमच्या हातीं देऊन सांभाळण्यास सांगितलें असून तुह्मीच लहानपणा दाखवून मला प्रश्न करितां हें ठीक नाहीं. ज्ञानदेव ह्मणाला आतां मनांत कोणतीही शंका न धरितां आपली अनुभवस्थिति मला उघड करून सांग. नामदेव त्याचा फारच आग्रह पाहून ह्मणाला—सांगतों तर ऐका:—अंगीं वैराग्यबळ ठेवून सर्व प्राणिमात्रांवर दया सारखी करणें; मी तूंपणाची गोष्टी अगदीं नसून प्रपंचतळमळ नसणें याला शुद्ध भजन असें ह्मणतात. बाह्यात्कारीं नमस्कार करून मनांत उत्तम मध्यम आणीत नाहीं त्याला अखंड नमन असें नांव आहे. जसा हरिण नादलुब्ध होऊन

सर्व देहभाव विसरून जातो त्याप्रमाणें मन तल्लीन करून हरि-कीर्त्तन ऐकावें, याला श्रवणभक्ति असें सज्ञान ह्मणतात. असें नामदेवाचें भाषण ज्ञानदेवानें ऐकून त्यास मोठें समाधान वाटून ह्मणाला—आजपर्यंत अनेक विष्णुभक्त झाले व पुढेंही होतील; परंतु नामदेवांच्या भक्तिगुणा एका रुक्मिणीरमणावांचून दुसऱ्या कोणास कळावयाच्या नाहींत. असा वाटेनें संवाद करीत करीत ते हस्तिनापुराजवळ आले व तेथें नामदेवानें कीर्तन आरंभिलें. तें ऐकून त्याबाजूचे लोक मोठ्या आनंदानें कीर्त्तन ऐकावयास येऊं लागले. त्यामुळें तेथील सर्व लोक भक्तिमार्गास लागले. हें वर्तमान त्यानगरांतील मुसलमान बादशाहा होता त्यास कळलें. तेव्हां त्याला क्रोध येऊन, मनांत ह्मणाला—नामदेवाचे कीर्त्तनाची परीक्षा पाहण्याकरितां जावें. असा विचार करून, ज्या ठिकाणीं कीर्त्तन चाललें होतें तेथें एक गाय आणून तिचा वध करून नामदेवास ह्मणाला—जर तूं ही गाय जिवंत करशील तर तुझें कीर्त्तन खरें मानूं. नाहीं तर हें सर्व पाखंड आहे; असें समजून ह्या गाईप्रमाणेंच तुझाही वध केला जाईल. असें बादशाहाचें वचन ऐकतांच सर्व कीर्त्तनरंग मोडून सर्व आबालवृद्धांस परमावधीचें दुःख झालें व सर्व लोक स्तब्ध झाले. पुनः बादशाहा ह्मणाला—तूं किती दिवसांत गाई उठवून देशील याबद्दल मला मुदत दे. त्यावर नाम-

ह्मणाला—महाराज, चार दिवसांचे आंत गाई उठवून ईन. नामदेवाचें असें भाषण ऐकून बादशाहा आपल्या घरीं निघून गेला. नंतर नामदेवानें श्रीपांडुरंगाचा धांवा आरं- भिला. व त्या कीर्तनमंडपांतच शोकाकुलित होऊन रडूं ला- गला आहे, तें पाहून इतर श्रोतेजनही रडूं लागले. ती रात्र सर्व मंडळी तेथेंच राहिली होती. दुसरे दिवशीं सकाळीं आ- पल्या घरीं सर्वजण निघून गेल्यावर नामदेव त्या गाईचें शीर मांडीवर घेऊन रडत आहे व श्रीपांडुरंगाचा धांवा करीत आहे. असा चार दिवस अहोरात्र धांवा करीत असतां अ- श्रूनीं सर्व भूमी तर होऊन गेली. नामदेव भूमीवर गडबडां लोळत देवा! धांव! धांव!! नाम्याला काळ ग्रासावयास जवळ पातला आहे अशी करुणावाणी श्रीपांडुरंगानीं ऐकून गुप्तरूपानें धांवत येऊन नामदेवाचे हृदयांत संचार करून, गाय उठविली व नामदेवास सावध केला तेव्हां नामदेव ह्मणाला देवा, तूं कोणत्या कामाला गुंतला होतास ह्मणून इतका उ- शीर लागला. माझा चार दिवस अंत कां बरें पाहिलास? देव ह्मणाले नाम्या, तूं चार दिवसांची मुदत आपल्या तोंडानेंच केलीस त्याला मी काय करूं! तूं त्याचदिवशीं उठवितों असें सांगितलें असतेंस तर मी तसाच आलों असतों. असें उभयतांचें भाषण होऊन देव गुप्त झाले.

शीर तोडलेली गाय नामदेवानें जिवंत केली अशी

बातमी सर्व नगरांत पसरून बादशाहाचे कानावर जातांच बादशाहा येऊन नामदेवाचे पायांवर मस्तक ठेविता झाला. व केल्या अपराधाची क्षमा मागुन पुनः पुनः शरण आला, नंतर सर्वांस आनंद होऊन आरती करून कीर्तनरंग विसर्जन करते झाले.

## गोष्ट ११ वी.

कबीर.

मागील अध्यायांत नामदेवानें गाय जिवंत केल्यावर बादशाहा त्यास शरण जाऊन केल्या अपराधाची क्षमा मागता झाला. नंतर तेथून नामदेव तीर्थें फिरत फिरत ईश्वराचे गुणानुवाद गात गात काशीक्षेत्राचे ठिकाणीं आला. तेथें स्नान करून शुचिर्भूत होऊन विश्वेश्वराचें दर्शन घेऊन चार महिने तेथेंच राहिला. तों एके दिवशीं असा चमत्कार झाला कीं, त्या काशीक्षेत्रांत कबीर नांवाचा भक्त रहात होता त्याचे येथें दोनप्रहर रात्रीस सर्व मनुष्यें झोंपीं गेल्यावर साधुसंत पाहुणे आले. त्यांस उभयतांनीं पाहून मुलांच्या आंगाखालील घोंगडी काढून बसावयास आसन दिलें. त्याचें घर अगदीं जीर्णदशेस आलेलें असून घरांत चिमटीभर दाणाही नव्हता. अशा अवस्थेमध्यें साधुसंत पाहुणे आले तें पाहतांच कबीर बायकोस ह्मणाला—कांहीं नैवेद्याकरितां आहे काय? ती ह्मणाली—घरांत

काहीं नसून शेजारीसुद्धां कोणी उसनें देत नाहीं असें नव त्यास सांगत सत्वाची हानी होईल ह्मणून बाजारांत निघाली तों एका वाण्याच्या दुकानीं जाऊन ह्मणाली–महाराज, मा झ्या घरीं साधुसंत पाहुणे आले आहेत तर त्यांना शिधा-सामुग्री द्या जे पैसे होतील ते मी आणून देईन. वाणी ह्म-णाला–तूं कोणाची कोण आहेस ? कबीरकांता ह्मणाली–मी आविंधजातीचा जो वैष्णवभक्त कबीर त्याची बायको आहे. असें ऐकतांच त्यावाण्यास कामवासना उत्पन्न होऊन ह्म-णाला–माझा हेतु पुरविशील तर तुला लागेल ती सामग्री मी देईन कबीराच्या बायकोनें विचार केला कीं आतां जर या-ला नाहीं ह्मणावें तर दुसरे कोठें कांहीं मिळणार नाहीं व सत्वाचा हा [illegible] होईल; असें मनांत आणून त्याच्या वचनास कबूल होऊन ह्मणाली–मी शिधासामुग्री देऊन तुमची इच्छा पूर्ण करण्याकरितां परत येतें; परंतु तें तिचें ह्मणणें त्या वाण्याला खरें वाटेना ! ह्मणून तिच्याकडून शपथ घेववून तिला सामुग्री देऊन पाठविली. तें सर्व सामान घेऊन तिनें साधुसंतांस देऊन त्यांनीं स्वहस्तांनीं स्वयंपाक करून भोजन केलें व तृप्त झाले. नंतर कबीरकांता आपल्या नवऱ्यास एकांतांत नेऊन ह्मणाली–मी ज्याच्यापासून आतां ही सामुग्री आणिली त्याचा मनोरथ पूर्ण करण्याबद्दल वचन दिलें आहे. तरी आपली आज्ञा व्हावी, नाहीं तर रात्र संपून वचनाचा भंग

होऊन सत्याची हानी होईल. असें कबीरानें ऐकतांच ह्मणां-
ला-चल तर मी तुला नेऊन पोंचवितों, आज आपल्या घरीं
साधुसंत येऊन तृप्त झाले हें त्याच्याच कृपेचें फळ आहे. असें
बोलून त्यावेळीं पाऊस लागत होता;करितां बायकोस खांद्या-
वर घेऊन वाण्याचे घरीं पोंचविता झाला व मनोरथ पूर्ण
करून लवकर ये असें सांगता झाला.

इकडे वाणी कबीरकांता आपल्यास ठकवून गेली, असें
समजून वाट पहात बसला होता तोंच कबीराची स्त्री त्याच
रस्त्यांतून आली. तिच्या पायांला किंचितही चिखल लागले-
ला नाहीं असें पाहतांच तो वाणी तिला ह्मणाला—तूं अशा
पावसांतून न भिजतां व पायांस किंचितही चिखल न लागतां
कशी आलीस ? ती ह्मणाली—आपणाकडून सामुग्री नेल्यावर
साधुसंत तृप्त झाल्यानंतर आपल्या मनोरथाबद्दल मी आपल्या
भ्रत्याजवळ आज्ञा मागितली. तेव्हां त्यांनीं आपण होऊन
येथें आणून मला सोडली व आपण घरीं परत गेले. असें
कबीरस्त्रीचें वचन ऐकतांच त्या वाण्यास पश्चात्ताप होऊन
ह्मणाला मी या नरदेहीं येऊन कांहींच सार्थक केलें नाहीं. क-
बीराच्या स्त्रीची मी व्यर्थ छळणूक केली. असा मनांत दुःखी
होऊन तिच्या चरणावर मस्तक ठेवून ह्मणाला माते मी केले-
ल्या अपराधाची मला क्षमा कर.मी अज्ञान बालक व तूं माझी
जननी आहेस. आतां तूं मला कबीराच्या पायांवर नेऊन

घाल. असें बोलून वारंवार नमस्कार करिता झाला. नंतर ती त्याला कबीरापाशीं घेऊन गेली. कबीराजवळ येतांच त्याच्या चरणावर मस्तक ठेवून केलेल्या अपराधाची क्षमा मागून श्रीरामभजन करूं लागला. ही बातमी नामदेवास कळतांच ज्ञानदेवास मागून दोघेही कबीराचे भेटीस आले. व एकमेकांस क्षमालिंगन देऊन भेटले. नंतर ज्ञानदेव नामदेवास ह्मणाला—पूर्वी क्षीरसागरीं नारायणांनीं आपणांस तूं उद्धवाचा अवतार व शुकअवतार कबीर शिंपल्याचे पोटीं अवतरेल. त्याप्रमाणें तुह्मीं अवतार घेऊन भक्तिमार्गास लोकांस लाविलेत अशा परस्पर खुणा आळखून भेटते झाले. नंतर ज्ञानदेव कबीरास ह्मणाला—साक्षात्, परब्रह्म अवतार जो पंढरीच्या ठिकाणीं अवतरला आहे तें पंढरीक्षेत्र एकवेळ येऊन दृष्टीनें पाहावें. अशी ज्ञानदेवाची वाणी श्रवण करून कबीरानें चरणीं लागून कार्तिकी एकादशीस येण्याचें कबूल केलें. नंतर कबीराची आज्ञा घेऊन नामदेव व ज्ञानदेव जाते झाले.

## गोष्ट १२ वी.

मागील अध्यायामध्यें कबीराची व नामदेवाची भेट होऊन, तेथून नामदेव व ज्ञानदेव गंगातट, गया, प्रयाग, अयोध्या, मथुरा, वृंदावन, द्वारका इत्यादि तीर्थें करीत मारवाड देशांत आले. तों ते ताहानेनें व्याकूळ होऊन

इकडे तिकडे फिरत असतां एक विहीर दृष्टीस पडली. तींत पाणी अगदीं तळाशीं गेलें होतें त्यामुळें पाणी काढण्याचें साधन कांहींच नव्हतें, तेव्हां ज्ञानदेव नामदेवास ह्मणाला, मला या बद्दलचा उपाय एक माहित आहे. कोणता ह्मणशील तर अगदीं लहान रूप धरून पाण्यांत प्रवेश करून जलप्राशन करणें. मग ज्ञानदेवानें सूक्ष्म रूप धरून आंत प्रवेश करून पाणी पिऊन वर आला. परंतु नामदेवास ताहान फारच लागली होती त्यास कांहीं उपाय सुचेना. तेव्हां ज्ञानदेव ह्मणाला—तूं कांहीं करूं नको मी तुला आतां पाणी आणून देतों. तूं मनांतील द्वैतभाव टाकून पाणी प्राशन कर. नामदेव ह्मणाला—ही माझी चिंता सर्वांतर्यामी वास करणारा जो पांडुरंग तो पुरी करणार नाहीं काय ? तूं स्वस्थपणें लक्ष्य लावून पाहा. असें ज्ञानदेवास सांगून आपण श्रीपांडुरंगाचा धांवा करूं लागला. व ह्मणाला—देवा, माझा तृषेनें प्राण व्याकूळ होत आहे; यावेळीं तूं जर न येशील तर दुष्ट लोक मला हांसतील, तरी त्वां येऊन माझी लज्जा रक्षण करावी. इकडे पंढरपुरीं देव रुक्मिणीस ह्मणाले—माझा नामदेव आज माझ्या दृष्टीस पडेना तर त्याला जीवावेगळा केला नसेना. असें देवाचें वचन ऐकून रुक्मिणी ह्मणाली—आपणांस आज नामदेवाची आठवण कां बरें झाली ! असा तो कोणत्या संकटांत पडला आहे. देव ह्मणाले—माझा

डावा डोळा आज लवत असून डावा बाहु स्फुरण करीत आहे ह्मणून मला चिंता उत्पन्न झाली आहे. अशा विचारांत आहेत तों नामदेवाची करुणावाणी ऐकूं आली. तव्हां नामदेव तृषेनें पीडिला आहे असें समजलें. त्या बरोबर देवांनीं त्या विहिरीचें पाणी कांठापर्यंत वाहावयास लाविलें. असा चमत्कार ज्ञानदेवीं पाहतांच त्याला मोठें आश्चर्य वाटलें. नंतर नामदेवास सावध करून आलिंगन दिलें व ह्मणाला—तुला देव पावले ही मोठी अघटित करणी शास्त्रविलीस. मग नामदेव सावध होऊन पाणी पिऊन शांत झाल्यावर ह्मणाला—मी जी जी आळ घेतों ती ती पंढरिनाथ पूर्ण करितो; तर त्याचें दर्शन मला कधीं होईल असें झालें आहे. असें ऐकून ज्ञानदेव ह्मणाले—तुझी संगत झाल्यापासून मला दुसरें कांहींच आठवत नाहीं, परमात्म्यास तूं वश करून आपली आळ पूर्ण करून घेतोस. असें बोलून नामदेवाचे चरणावर साष्टांग दंडवत घातलें. त्यावेळीं नामदेव तृषाक्रांत झाला व देवानें कूप वरपर्यंत भरला त्या स्थळीं अजूनही कूप वाहत आहे व त्याठिकाणीं मार्गशीर्षांत मोठी यात्रा भरते, तेथून नामदेव व ज्ञानदेव निघते झाले व मार्गी तीर्थे करीत करीत बदरिकाश्रम, हिमालय, वोढ्यानागनाथ, ओंकार, माहाबळेश्वर, केदार, उज्जनी, माहाकाळेश्वर, परळीवैजनाथ, सोरटीसोमनाथ. [illegible]

भीमाशंकर, मलपुऱ्या, नागज्योतिर्लिंग, रामेश्वर इत्यादि तीर्थें करून ते उभयतां रामेश्वराहून मार्गें परतले व माघवद्य चतुर्दशीस ह्मणजे शिवरात्रीस नागनाथास आले. तेथें स्नानादिक नित्य कर्में साधुन नामदेवानें त्याठिकाणीं टाळ विणा घेऊन कीर्तन सुरू केलें. तें ऐकण्याकरितां असंख्य लोकांची दाटी झाला आहे. व सर्वजन प्रेमानंदीं गुंग होऊन मोठ्या गजरानें विदेही होऊन टाळ्या वाजवीत आहेत तों कांहीं ब्राह्मण स्नानसंध्या करून आंगास विभूति लावुन रुद्राक्षांच्या माळा गळ्यांत घालुन, ओलीं धोतरें आंगावर घेऊन, पूजासामग्रीनिशीं माहाद्वारांत आले. व पाहतात तों लोकांच्या दाटीमुळें आंत जाण्यास रस्ता नाहीं. तेव्हां लोकांस दूर व्हा आह्मांस शिवूं नका असें ह्मणत चालले आहेत व कोपाविष्ट होऊन ह्मणाले—अरे हें येथें काय मांडलें आहे ? टाळ्या पिटून हांका मारणें हें पंढरीस चालतें. हें येथें या नागनाथास आवडत नाहीं. असें त्यांचें भाषण ऐकून श्रोतेजन ह्मणाले—हरिहर हे आपण भिन्न समजूं नका. जसें तीर्थ आणि जळ हें भिन्न नाहीं त्याप्रमाणेंच हरिहर समजावे. हें श्रोत्यांचें वचन ऐकून ब्राह्मणास मोठा राग येऊन ह्मणाले—हे मूर्ख आह्मांस ज्ञान सांगावयास आले पहा ? आह्मीं ब्राह्मण उंचवर्ण शास्त्राधिकारी आहों आह्मांस नामदेवाचें सिद्धांतज्ञान आवडत नाहीं. तुह्मीं येथून

सर्वजण चालते व्हा, नाहींतर ताडण केलें जाईल ! शिवपू-
जेला उशीर झाला, या नामदेवाला बाहेर पिटाळून काढा !
आतां आह्मांस दुसऱ्यानें स्नानें केलीं पाहिजेत ! असें बो-
लून नामदेवाजवळ जाऊन ह्मणाले–अरे ! हा तूं काय गल-
बला मांडला आहेस ! तूं आपल्याबरोबर यालोकांसही वेड
लाविलें आहेस ! तूं येथून चालता हो ! तुला पाहिजे तर
देवळाच्या मागें जाऊन कीर्तन कर. नामदेवानें असें त्याचें
भाषण ऐकून त्यास साष्टांग नमस्कार घातला. व बरें आहे
असें ह्मणून कीर्तन विसर्जन करून देवळामागें गेला त्याबरो-
बर सर्व लोकही जाऊन बसले आणि मोठ्यानें गर्जना करून
मोठ्या उल्हासानें टाळ्यांचा गजर केला. त्याबरोबर नाम-
देवाचे डोळ्यांतून अश्रुधारा वाहूं लागल्या. व भगवं-
ताचा धांवा करुणस्वरानें करूं लागला त्याबरोबर नव-
लक्ष पताका आकाशांतून उतरून कीर्तनांत येऊन ब-
सल्या त्या पाहतांच सर्व लोकांस मोठें आश्चर्य वाटलें व
नामदेव मोठ्या प्रेमानें विठ्ठलनामाची गर्जना करून
नाचूं लागला. व आपल्या भजनांत ह्मणूं लागला कीं,
देवा ! येथें सर्व गोष्टी मला अनुकूल आहेत परंतु नागना-
थानें विन्मुख होऊन कीर्तनांत पाठ केली. तरी माझ्या
हातून काय अपराध घडला तें कळत नाहीं. शिवालय
समोर असतें तर कीर्तनास. रंग चढला असता. देवा !
मला वनांतरीं तृषा लागली त्यावेळीं माझी इच्छा पूर्ण

केलीस असें असतां तूं आतां निष्ठुर होऊन, कां बरें येत नाहींस ? असा नामदेवानें विलाप करतांच देवळाचें तोंड पूर्वेकडे होतें तें पश्चिमेकडे झालें. असें पाहतांच सर्व भक्तमंडळीस मोठा आनंद होऊन मोठ्या गजरानें टाळ्या पिटून नामदेवास चंद्रमौळी खरोखरच पावला असें ह्मणूं लागले. ती शिवरात्रीची रात्र संपून सूर्योदय झाल्यावर पुजारी ब्राह्मण बाहेर निघतांच द्वारांत नामदेवाचें कीर्तन होत असलेलें पाहिलें. तीर्थी प्रातःस्नान करून अर्घ्यदान देऊं लागले तों सूर्यनारायण पश्चिमेस उगवला कीं काय ह्मणून पाहूं लागले तेव्हां देऊळ फिरून नामदेवासमोर झालें आहे असें त्यांना समजलें. असें पाहतांच ब्राह्मणांस आश्चर्य वाटून ह्मणूं लागले कीं, नामदेवास देव प्रसन्न होऊन त्यानेंच देऊळ फिरविलें. आपण आपल्या कर्माचा अभिमान धरून नामदेवाची छळणूक केली. असें मनांत आणून कीर्तनांत प्रवेश करून नामदेवास साष्टांग नमस्कार घालते झाले. व ह्मणाले—नामदेवा, तुझा पार ब्रह्मदेवासही कळण्यास कठीण आहे. असें दुर्वासानें अभिमान धरून अंबरीषाचें छळण केलें. तें संकट जाणून जगन्निवासानें आपल्या अंगें गर्भवास सोशिले. तसेंच तूंही अघटित करून दाखविलेंस. नंतर नामदेवानें आरती करून नमस्कार घालून सर्वांस खिरापती वांटल्या. त्यावेळीं स्वर्गीहून आलेल्या पताका आपोआप उडून वर गेल्या. तें कौतुक पाहून

सर्वजनांस आश्चर्य वाटलें. शिवालय फिरलें तें तसेंच अजू-
नही आहे.

## गोष्ट १३ वी.

### नामदेव.

ज्ञानदेव व नामदेव औंढ्या नागनाथास नमस्कार क-
रून निघाले ते पंढरी क्षेत्रासमीप येतांच, दुरून कळस दृष्टीस
पडल्याबरोबर नामदेवानें साष्टांग नमस्कार घातला. व टाळ-
विणा घेऊन मोठ्या प्रेमानें कीर्तन करीत महाद्वारीं येऊन
लोटांगण घातलें. त्यावेळीं तो तेथें विदेही होऊन पडला. मग
ज्ञानदेवानें त्याला वर उठवून सावध करून हातीं धरून,
शेजारच्या देउळांत नेला. तेथेंही साष्टांग दंडवत घातला. तेव्हां
भगवान सिंहासनावरून खालीं उतरून क्षेमालिंगन द्यावयास
पुढें आले. नंतर नामदेवास पोटाशीं धरून आलिंगन देतांच
नामदेवाच्या डोळ्यांतून अश्रुधारा वाहूं लागल्या. नामदे-
वानें देवाचे चरणावर मस्तक ठेवून, तो दंजुळवाणीनें म्ह-
णाला—देवा, मी फार श्रमलों तरी आतां आपण मला कृपा-
दृष्टीनें पाहावें मी अनेक तीर्थे केलीं; पण माझें मन चंद्रभा-
गेच्या ठिकाणीं बसलें आहे. ध्वज आणि पताका जेथें
नाहींत त्या देवाविषयीं शंका माझ्या मनांत येते. हृषीकेश
माईबाप माझा तूंच आहेस. असें नामदेवाचें वचन ऐकून

देव ह्मणाले–नाम्या रात्रंदिवस तुझेशिवाय मला चैन पडत नव्हतें. तूं दूर गेला होतास त्यामुळें ही पंढरी मला उदास भासत होती. आतां माझ्या दृष्टीवेगळा तूं होऊं नको. असे देव बोलून इतर संतांस ह्मणाले–माझ्याशिवाय नामा कष्टी. मग दोन्हीं हातांनीं कवटाळून नामदेवाचे डोळे पुसले व तुळशीची माळा गळ्यांत घातली. इतक्यांत भेटी करितां निवृत्ती, ज्ञानदेव, सोपान, विसोबाखेचर, नरहरी सोनार इत्यादि आले. त्यांनीं लोटांगणें घातलीं व नामदेवास आलिंगनें देऊन जयजयकारें गर्जना केली. तेतीसकोटी देवांनीं सुमनवर्षाव केला, ऋषिगण, गंधर्व, इंद्रादिदेव आदिकरून दृष्टिसुख घेण्याकरितां आले होते. इतक्यांत आदिमाया रुक्मिणी हातांत पंचारती घेऊन आली व देवभक्तांस ओवाळिती झाली. व नामदेवाची हनुवटी धरून पाहूं लागली तेव्हां देव नामदेवास ह्मणाले–नाम्या, तूं तीर्थें करून आलास तरी आतां उद्यापन करून ब्रह्मसंतर्पण कर ह्मणजे जन्माचें सार्थक होईल. ब्राह्मणांस येथें अन्न अर्पिल्यानें मी एक कल्पपर्यंत तृप्त होतों तरी क्षेत्रवासी ब्राह्मणांस त्वां भोजनास आणावें. असें नामदेवास सांगून त्याचा हात धरून, त्याला अंतरमंदिरीं घेऊन गेले. नंतर देव हास्यवदन करून रुक्मिणीस ह्मणाले, नाम्याची आणि माझी प्रीति फार आहे. त्याला एक क्षणही दूर ठेववत नाहीं. असें ऐकतांच जगन्माता ह्मणाली–देवा, नामा

तुमचा परमसखा आहे तो माया ममता टाकून एकनिष्ठपणें तुमचें ध्यान करीत आहे तरी त्याचें कार्य आपणांस स्वतः केलें पाहिजे. तरी तुह्मी नाम्याला बरोबर घेऊन ब्राह्मणांस आमंत्रण देऊन या. आपणास रिद्धिसिद्धी अनुकूल असतां काय कमी आहे. सर्व आपल्या इच्छेप्रमाणें होणारें आहे. असें रुक्मिणीचें वचन ऐकून नामदेवाचा हात धरून देवानें गृहस्थाचें रूप धरून बरोबर निवृत्ती, ज्ञानदेव, सोपान, विसोबा खेचर, चोखा, नरहरी सोनार इत्यादि संत मंडळीस घेऊन ब्राह्मणांस आमंत्रण देण्यास निघाले. देव आपल्या दासाचें कार्य सिद्धिस नेण्याकरितां क्षेत्रप्रदक्षिणा करीत ब्राह्मणांस पाहत पाहत व त्यांना आमंत्रणें देत चालले आहेत तों ब्राह्मणांनीं प्रश्न केला कीं, आपण कोण कोठचे, तुमचें नांव काय? व तुह्मीं काय कार्य आरंभिलें आहे व तुमचें बिऱ्हाड कोठें आहे? यावर देव ह्मणाले—आह्मी कुळ आणि वृत्ती ह्या भक्तांस ठाऊक असून मी नामदेवाचा मित्र आहें. आमचें बिऱ्हाड देवळांत केलेलें आहे. मला अनंत असें ह्मणतात. तुह्मीं स्नानसंध्यादि कर्में आटोपून भोजनास यावें. असें आमंत्रण करून देवळांत येऊन रुक्मिणीजवळ झालेली सर्व हकीगत सांगते झाले. ती ऐकून रुक्मिणी ह्मणाली—ते ब्राह्मण कर्मठपणाचे अभिमानी आहेत. सद्भावाशिवाय तुमचें दर्शन त्यांना व्हावयाचें नाहीं. असें आदिमाता

बोलत आहे तों असा चमत्कार झाला कीं, इच्छामात्रें करून अष्टसिद्धि तेथें येऊन उभ्या राहिल्या व सर्व साहित्याची त यारी करूं लागल्या. नंतर नामदेवास मंगलस्नान घालून मंत्रोपचारें पुण्याहवाचन करून, सत्यभामा, राई रुक्मिणी अक्षय्य वाणें घेऊन आल्या. पांडुरंगांनीं वस्त्रालंकारादिकांचा नामदेवास अहेर केला. याप्रमाणें सोहळा चालला आहे तों पाकनिष्पत्ती झाल्याची वर्दी येतांच सकळ ब्राह्मणांस बसावयास आसनें देऊन देव त्यांची पूजा करूं लागले. पीतांबरानें त्यांचे चरण पुसून ते चरणांगुष्ठ मस्तकीं वंदन करून सर्वांस एकपंक्तीस बसविलें व सुवर्णकलश देऊन पात्रांवर बसावयास आज्ञा दिली आणि रुक्मिणी नानाप्रकारचीं पक्वान्नें वाढूं लागली. नंतर नामदेवास बोलावून त्याचे हातें संकल्प सोडविला. ब्राह्मण जेवून तृप्त झाल्यावर करशुद्धी देऊन विडे खावयास दिले व देवांनीं प्रार्थना केली कीं, आतां एक क्षणभर स्वस्थ बसा. आमचें जेवण झाल्यावर आपण दक्षिणा घेऊन जावें

असें देवाचें वचन ऐकून ब्राह्मण संतुष्ट होऊन म्हणाले— तुम्हास आमचा परामर्ष ठेवतांना फार श्रम झाले आहेत. आतां तुम्हीं स्वस्थपणें जेवावयास जा. तों पर्यंत आम्ही येथें बसतों. असें म्हणून पीतांबरांत अक्षता घेऊन नामदेवाचे माथ्यावर टाकून वैष्णवांसहित जेवावयास बसण्याची आज्ञा दिली. नंतर देवांनीं आपल्या पंक्तीला उद्धव

अक्रूर, नारद, तुंबुरु, आदिकरून घेऊन नामदेव माहाद्वारीं होता त्यास बालवावयास गेले; तो नामदेव देहभान-रहित होता. त्यास देवांनीं शुद्धीवर आणून पंक्तीस आणून बसविलें व देव ह्मणाले–नामदेवा ! हे तुझ्या भेटीकरितां ज्ञानदेव निवृत्ती वगैरे भक्त आले आहेत, त्यांच्या जवळ अमृतवचनें बालून त्यांस सुखी करावें. असें सांगताच सर्वांच्या चरणांवर नामदेवानें मस्तक ठेविलें. नंतर देव आपल्या हातांनीं नामदेवास ग्रास देऊन वदन कुरवाळूं लागले. व तीर्थयात्रेंत झालेला शीणभार विचारूं लागले व ह्मणाले–आतां तूं कोणत्याही प्रकारची काळजी करूं नको. तुला सांभाळणार मी तुझ्याजवळच आहें. असें सांगून नामदेवाचें उष्ट अन्न देव आवडीनें खाऊं लागले, असें पाहतांच ब्राह्मणांस आश्चर्य वाटून ते आपसांत ह्मणूं लागले. अरे आपलें कर्म आज बुडालें खरें.याच्या बायकांनीं जें अन्न वाढलें तें आह्मीं खाल्लें, पण हा जातीचा कोण आहे याचा विचार आपण कांहींच केला नाहीं. बरें असो जें झालें तें झालें. आतां कोणी कोणाजवळ बोलूं नका. हा नामदेवाचा बाप असें समजून उगाच राहावें. असा विचार करून दक्षिणा घेऊन चालते झाले. पुढील अध्यायांत देवांनीं ब्राह्मणांस काय उत्तर दिलें तें सांगितलें आहे.

---

# गोष्ट १४ वी.

दुसरे दिवशीं ब्राह्मण देवळांत येऊन श्रीपांडुरंगास ह्मणाले—नामदेव हा जातीचा शिंपी असून त्याचें उच्छिष्ट सेवन कसें केलें? ह्याबद्दल आपणांस प्रायश्चित्त घेतलें पाहिजे. पांडुरंग ह्मणाले—तुमच्या शास्त्रांत याबद्दल काय प्रायश्चित्त सांगितलें आहे तें मला सांगा. माझा निश्चय हाच कीं हरिदासाचे पायांची धूळ व तुमचें चरणतीर्थ सेवून मी तृप्त होतों. नामदेवासारखा भक्त व पंढरपुरासारखें तीर्थ या पृथ्वीवर दुसरें नाहीं. चंद्रभागेचें स्नान केल्यानें जन्माचे पातकाचा नाश होतो, जो माझे नामाचा उच्चार करितो तो माझा जिवलग सखा होय. ब्राह्मण ह्मणाले—चंद्रभागेच्या तीरीं जाऊन मंत्रोक्त विधीनें स्नान करून, ब्राह्मणांस सुवर्णदान दिलें पाहिजे. तेव्हांच पांडुरंग नामदेवास बरोबर घेऊन चंद्रभागेवर येतांच त्यांच्या मागून ब्राह्मण आले. नंतर पुंडलिकास नमस्कार करून आंगास गोमय लावून स्नान करूं लागले व ब्राह्मण वेदोक्त मंत्र ह्मणूं लागले. पहा ज्याच्या चरणांगुष्ठापासून पवित्र गंगा निघाली, त्याला चंद्रभागेंत उभा करून ब्राह्मण प्रायश्चित्त देत आहेत. मग ब्राह्मणांचें तीर्थ घेऊन देव संतांसह देवळांत आले व ब्राह्मण आपल्या घरीं गेले. मग रुक्मिणीनें सुवर्णपात्रें आणून देवभक्तांस भो-

जन घातले. नंतर विडे वगैरे देऊन, देव रुक्मिणीच्या मंदि-
रांत जाऊन पलंगावर जाऊन पडले आहेत, तोंच ब्रह्मवीणा
हातीं घेऊन नारदाची स्वारी तेथें आली. त्यास आलिंगन
देऊन ह्मणाले–तुझ्या गायनश्रवणानें मला फार संतोष होतो.
असें पांडुरंगाचें भाषण ऐकून नारदानें स्तुती करून भक्तांचें
रक्षण करावें अशी प्रार्थना केली, तेव्हां देवांनीं आपल्या
गळ्यांतील सुमनहार काढून नारदाच्या गळ्यांत घातला व
नारदानें गमन केलें नंतर राधा रुक्मिणीजवळ येऊन ह्म-
णाली–बाई ! आज देवांनीं प्रायश्चित्त कां बरें घेतलें ? रु-
क्मिणी बोलली , नामदेवाचे भक्तीला भुलून, भक्तांचा मान
वाढावा याकरितां देव लीला करून दाखवितात. असें ऐकून
राधा निघून गेली.

इकडे नारदमुनीची स्वारी सत्यभामेच्या मंदिरीं आली.
त्यांस सत्यभामेनें नमस्कार करून बसावयास आसन देऊन
ह्मणाली–देवांनीं कोणत्या जन्मीं नामदेवाचें ऋण केलें होतें
ह्मणून आतां त्याचें कोड पुरवितात व भक्तासाठीं आपण
श्रम भोगितात. नारद बोलले–लोकांस लीला दाखवून भक्तां-
चे मनोरथ पूर्ण करण्याकरितांच त्यांनीं अवतार घेतला आहे.
याप्रमाणें सत्यभामेस सांगून नारद जाते झाले. तिकडे रुक्मि-
णी देवाच्या पलंगाजवळ येऊन ह्मणाली–तुह्मांस सर्वांपेक्षां
जास्त काय आवडतें तें सांगा.देव ह्मणाले–मला माझा जिव-

लम सखा नामदेव सर्वांपक्षां जास्त आवडतो मला भक्ताशिवाय क्षणभर सुद्धां करमत नाहीं. भक्तांनीं माझे गुणानुवाद गावे व त्यांचे मनोरथ म्यां पुरवावे होच माझी इच्छा आहे. नाम्याशिवाय मला क्षणभरही चैन पडत नाहीं. असें संभाषण चाललें आहे तों उजाडलें.

## गोष्ट १५ वी.

सूर्योदय झाल्यावर सर्व भक्त मिळून श्रीपांडुरंगाचे दर्शनास आले व नामघोष करून नमस्कार घालूं लागले. त्यांना देव ह्मणाले—काल मी प्रायश्चित्त घेतलें त्यावेळीं ब्राह्मणभोजन घालण्याचा संकल्प केला आहे तरी ब्राह्मणांस आमंत्रण देऊन बोलवावें व चतुर्भुज रूप धरून कौतुक दाखवावें. रुक्मिणी ह्मणाली—तुह्मीं ब्राह्मणांस आमंत्रण देऊन या.मी स्वयंपाकाची तयारी करून ठेवितें, पंढरिनाथ नामदेवास हांसून ह्मणाले, तुला अजून एक कौतुक करून दाखविलें पाहिजे.नामदेव बोलला, तुमच्या मनांतील जाणणारा मी व माझ्या मनांतील आपण आहां.सर्व कर्ता करविता देवा तूंच आहेस नंतर देव भक्तांस बरोबर घेऊन ब्राम्हणांस अक्षता देऊन ह्मणाले—आज आमच्या येथें भोजनास आलें पाहिजे. ब्राह्मण बोलले, आमचेवर कृपा करून, अशा प्रकारें सांभाळ करीत जावा. इतकेंच आमचें मागणें आहे. तेथून देवळांत येऊन रुक्मिणीजवळ

वृत्तांत कळविला—ब्राह्मण नित्यनेम सारून देवळांत आले, त्यांस देवांनीं नमस्कार करून आसनावर बसविलें. मग पूजा करून सुवर्णपात्रें वाढून भोजनास बसवून संकल्प सोडतांच ब्राह्मण जेवून तृप्त झाले. त्यांस विठ्ठ देऊन ह्मणाले—आमचें पुण्य ह्मणून तुमच्या भेटीचा समागम झाला. आतां आह्मीं व संतजन एक पंक्तीस भोजन करितों तोंपर्यंत तुह्मीं बसावें. असें ब्राह्मणांस सांगून निवृत्ती, ज्ञानदेव, सोपान, सांवता, जगन्मित्र, सुदाम, विसोबा खेचर, नरहरि सोनार, चोखामेळा, गोराकुंभार या सर्वांस बोलावून, त्यांची पूजा करून पात्रांवर बसविलें. नंतर रुक्मिणी राही इत्यादि स्त्रियांनीं पक्वान्नें ताटें भरून आणून वाढलीं, तेव्हां देव भक्तांच्या मुखांत ग्रास देऊं लागले. याप्रमाणें सर्व संत जेवून तृप्त पावले. त्यावेळीं देवांनीं विमानांत बसून, देवभक्तांवर पुष्पवृष्टि केली. असें ब्राह्मणांनीं पाहून आपल्या कर्मठपणाचा अभिमान सोडून ह्मणाले—नामदेव हा प्रत्यक्ष भगवद्भक्त अवतरला आहे. हें ब्राह्मणाचें वचन ऐकून देवांनीं चतुर्भुज रूप प्रगट करून नामदेवास आलिंगन दिलें व लक्ष्मीसहित विटेवर जाऊन उभे राहिले. तें सर्व ब्राह्मणांस विठ्ठल रूप दिसूं लागलें. त्याबरोबर सर्वांनीं जयजयकार केला. देव ब्राह्मणांस ह्मणाले—माझ्या नाम्यावर तुमची कृपादृष्टि असूंद्या. मी भक्ताधीन आहें, नि-

वृत्ती, ज्ञानदेव, सोपान ह्यांनीं मला आपल्या स्वाधीन ठेविलें आहे. त्यावर ब्राह्मण ह्मणाले–आमचे प्रपंच तोडून आपला चरणवियोग न होईल असें करावें. असें ऐकून देवांनीं सर्वांस आलिंगन दिलें व ह्मणाले–ज्ञानदेव सांगतोल तें ऐका. नंतर देव ज्ञानदेवास ह्मणाले–हे ब्राह्मण तुमच्या स्वाधीन केले आहेत. यांचे मस्तकावर हात ठेवावा. तेव्हां ज्ञानदेवानें पांडुरंगास नमस्कार घातला व नामदेवानें अद्भुत प्रेम कथन केलें. ही कथा तीर्थावळी नामक ग्रंथांत सांगितली आहे. पुढें कूर्मदासाचें चरित्र सावधानचित्तानें श्रवण करावें.

---

## गोष्ट १६ वी.

### कूर्मदास.

पैठणामध्यें कूर्मदास नामें एक ब्राह्मण राहत असे. त्याला जन्मतांच हात पाय नव्हते. त्या गांवांत कीर्तन होत असे, तेथें तो दररोज ऐकावयास जाई. एके दिवशीं पंढरीमाहात्म्याचें कीर्तन चाललें असतां, कूर्मदास हात जोडून ह्मणाला—पांडुरंग मला पंढरीस नेईल काय ? असें त्याचें भाषण तेथील लोक ऐकून हांसूं लागले व ह्मणाले— अरे आह्मीं संपत्तिवान असून ह्मातारे होत आलों तरी आ.चें जाणें होत नाहीं आणि तुला करचरण नाहींत ग जाणार कसा ? कूर्मदास ह्मणाला—हा नरदेह मात्र

झाला आहे, तरी एकवेळ पंढरीस जाऊन चौऱ्यांशीचा फेरा चुकवावा असें बोलून तेथून घसरत घसरत निघून एका गांवांत मारुतीचें देऊळ होतें तेथें येऊन उतरला. तों त्याला भूक फार लागली होती. तेव्हां त्यानें पंढरीनाथाचा धांवा केला तो करुणा ऐकून देव एका व्यापाऱ्याचें रूप धरून त्या देवळांत आले व कूर्मदासास ह्मणाले—तुह्मांस हातपाय नसतां कोठें जातां! तुमचें नांव काय? कूर्मदास ह्मणाला—मी पंढरीस जातों; मला कूर्मदास असें ह्मणतात. व्यापारी बोलला. बरें झालें. आह्मांसही पंढरीसच जाणें आहे; तर एकमेकांच्या सोबतीनें जाऊं! कूर्मदास ह्मणाला—माझी सोबत तुमच्या काय कामाची! व्यापारी ह्मणाला—पंढरीस माझें दुकान आहे मला विठोबा खिस्ती असें ह्मणतात. माझें इतकें चाहेंचें कांहीं काम नाहीं, मला सावकाश जाणें आहे, कारण वाटेनें आमचें कांहीं येणें आहे, ह्मणून दररोज कोस अर्धा कोस चाललें ह्मणजे पुरे. असें त्याचें वचन ऐकून कूर्मदासास आनंद झाला. नंतर तेथें जेवण करून उभयतां भोजन करून झोंपीं गेले. सकाळीं व्यापाऱ्यानें कूर्मदासाला उठवून मार्गास लाविला व ह्मणाला—मी पुढें जातों तुह्मीं हळूहळू या. संध्याकाळीं मी बिऱ्हाडीं येईन, असें सांगून अदृश्य झाला. कूर्मदास मार्ग चालत चालत एका गांवीं गेला तेथें विठोबाची वाट पाहत राहिला. तों विठोबा तेथें प्रगट झाले व त्याच्याविषयींची

व्यवस्था करून दोघेही झोंपीं गेले. याप्रमाणें ज्या ज्या ठिकाणीं कूर्मदास राहो त्या त्या ठिकाणीं देव येऊन त्याचें रक्षण करीत असत. जर एखादे ठिकाणीं गांव लांब असून मध्यें अरण्य आलें तर त्या ठिकाणीं गांव उत्पन्न करीत असत; परंतु देव भक्तास कष्ट देत नव्हते. असा चार महिने मार्ग क्रमण करीत असतां कार्तिक शुद्ध दशमीच्या दिवशीं लहुळास येऊन पोंचला व मनांत ह्मणतो—मला एकादशीचा सोहळा पाहावयास मिळत नाहीं असें ह्मणून इतर वारकऱ्यांबरोबर देवास निरोप पाठवून धांवा करूं लागला.

इकडे पंढरपुरीं महाद्वाराचे ठिकाणीं नामदेव कीर्तन करीत होता त्या ठिकाणीं ते सर्व वारकरी चंद्रभागेचें स्नान करून आले व एकमेकांस आलिंगनें देऊन भेटूं लागले. तेव्हां एक मनुष्य स्मरण करून देवास ह्मणाला—हे पांडुरंगनाथा, तुझ्या पायांचे ठिकाणीं हेतु ठेवून कूर्मदास येत आहे त्यानें तुला भेटण्याकरितां बोलाविलें आहे. हा वृत्तांत देवानें ऐकिला, मग नामदेवास व ज्ञानदेवास बोलावून त्या दोघांचे हात धरून, कूर्मदासाचे भेटीस निघाला. तों वाटेंत अरण्यभेंडी ह्मणून गांव लागला तेथें येतांच देव मनांत ह्मणाले—सांवत्या माळ्याची भेट घेऊन नामदेवास कौतुक दाखवावें. नंतर देव नामदेवास ह्मणाले—मला फार तहान लागली आहे. तर ह्या मळ्यांतून पाणी पिऊन येतों, तोंपर्यंत तुह्मी येथें बसा. असें सांगून सांवत्याजवळ आले.

तों सांवता नेत्र झांकून पांडुरंगाचें नामस्मरण करीत होता. त्याच्या मस्तकावर वरद हस्त ठेवून सावध करून आलिंगन दिलें. सांवता डोळे उघडून पाहतो तों देव दृष्टीस पडले त्याबरोबर त्यानें चरणाला मिठी घातली. व ह्मणाला—आपणांस फार श्रम झाले आहेत तरी स्वस्थ बसा. देव ह्मणाले—र. हे पाठीस दोघे चोर लागले आहेत; याकरितां मला कोठेंतरी लपवून ठेव. सांवत्यानें मनांत विचार केला कीं, याला लपविण्यास कोठेंच ठाव नाहीं;तरी आतां आपल्याच हृदयांत सांठवावा असें मनांत आणून खुरपें घेऊन आपलें पोट चिरून त्यांत देवास लपविलें आणि वरून वस्त्र बांधून, नामस्मरण करीत राहिला.

इकडे नामदेवास विचार पडला कीं, देव असून कां बरें येत नाहीं. असें बोलून स्फुंद स्फुंदून धांवा करूं लागला. नंतर मळ्यांत जाऊन शोध करूं लागला. तों सांवतामाळी हरिरूप होऊन बसला आहे. त्याला ह्मणाला—माझा विठोबा तूंच गिळिला आहेस तो माझा मला दे. असें करुणावाणीनं बोलूं लागला तेव्हां देव आंतून ह्मणाले—माझ्याकरितां नामा कासावीस होत आहे तरी मला बाहेर काढ. असें सांगतांच सांवत्यानें खुरपें काढून पोट फाडलें व देवास बाहेर काढलें. त्या बरोबर नामदेवास आलिंगन दिलें. मग देव हांसून ह्मणाले—चला आतां कूर्मदासाचे भेटीला जाऊं. नंतर ज्ञानदेव, सांवता, नामदेव आणि देव असे कूर्मदासाजवळ आले.

त्यांना पाहतांच कूर्मदासानें लोटांगण घातलें. तेव्हां देव ह्मणाले–तुला जो वर पाहिजे तो माग. कूर्मदास ह्मणाला— मला हेंच पाहिजे कीं तुह्मीं याच ठिकाणीं रहावें. तेव्हांपासून देव तेथें राहिले व तेथें यात्रा भरूं लागली.

## गोष्ट १७ वी.

### राका कुंभार.

श्रीक्षेत्र पंढरी येथें राका नांवाचा एक कुंभार वैष्णवभक्त रहात असे. त्याची बंकानांवाची स्त्री मोठी पतिव्रता होती. तिला बंका नांवाची एक कन्या होती. तीं मडकीं घडून त्यावर आपला उदरनिर्वाह चालवीत असत. त्यानीं घडलेलीं हिरवीं मडकीं माजघरांत ठेविलीं होतीं, त्यांत मांजर व्यालें होतें तें राका यास माहित नव्हतें. तें मांजर त्या मडक्यांत आपलीं पोरें ठेवून बाहेर फिरावयास गेलें होतें. त्याचदिवशीं राक्यानें सर्व मडकीं आव्यांत भाजण्याकरितां नेऊन घातलीं व अग्नि पेटविला. त्यांत तें पोरें असलेलें मडकेंही गेलें. मांजरी बाहेरून येऊन माजघरांत मडकें पाहते तों तें तेथें नाहीं, तेव्हां बाहेर येऊन आव्याभोंवतीं ओरडून घिरट्या घालूं लागलें. असें राक्यानें पाहतांच बायकोस ह्मणाला—माझेकडून आज मोठा अपराध घडला. मांजरीचीं पोरें असलेलें मडकें आव्यांत गेलें. असें बाय-

कोनें ऐकनाच तीही शोकाकुलित झाली. व नीं उभयतां दे-वाचा धांवा करूं लागलीं. नीं ह्मणालीं—अर हीं पोरें जिवंत निघालीं नर पुढें आह्मीं संसार करणार नाहीं. असा त्यांचा निश्चय देवांनीं जाणून त्या आव्यांतील पोरें असलेलें मडकें तसेंच कच्चें ठेवून पोरांस किंचितही इजा दिली नाहीं. तिसरे दिवशीं आग्नि शांत झाल्यावर राक्यानें आव्यांतील मडकीं काढलीं तेव्हां पोरें असलेलें मडकें कच्चें निघून पोरें जशींच्या तशीं निघालीं. असें पाहतांच सर्व लोक राक्याची स्तुति करूं लागले. नंतर राका बायकोस ह्मणाला—मी देवाला नवस केला होता कीं, पोरें जिवंत निघालीं तर संसार करणार नाहीं. तर आपणांस संकटसमयीं पांडुरंग पावला. असें बोलून ब्राह्मण बोलावून सर्व घर लुटविलें व रस्त्यावरच्या चिंध्या जमावून त्यांची लंगोटी नेसून हरिहरि ह्मणत राहिला.

एकेदिवशीं त्याची बंका नांवाची कन्या नदीवर धुण्याकरितां गेली होती. तेथें नामदेवाची कन्या आली होती. ती धुवीत असतां धुण्याचे शितोडे बंकेवर उडूं लागले, तेव्हां बंका ह्मणाली—हळूच धुणें धु: शितोडे आंगावर येतात ! त्यावर नामदेवाची मुलगी ह्मणाली—बाई, तुझें सोवळें मोठें कठीण दिसतें. तुझा बाप संसार सोडून दारोदारीं फिरूं लागला आहे ! असें बंका ऐकून ह्मणाली—होय होय ! रडका तुझा मामा डोचकें फोडून देवाला बोलावितो !

अशाप्रकारें दोघी भांडून घरीं गेल्या. नामदेवाचे कन्येनें नदीवर झालेली हकीगत बापास सांगितली. ती ऐकून महाद्वारीं देवाजवळ येऊन, देवाची प्रार्थना करून म्हणाला—हे देवाधिदेवा पंढरीनाथा! राका तुझा भक्त निरपेक्ष किंवा कामयुक्त आहे तें सांग. देव म्हणाले—त्याचेसारखा भक्त या पृथ्वीवर नाहीं. नामदेव बोलला—तर मग त्याची स्थिति मला दाखवावी. नंतर देव रुक्मिणीस बरोबर घेऊन नामदेवासहित राका कुंभार ज्या रानांत लांकडें गोळा करीत होता तेथें आले. व गुप्तपणें कौतुक पाहूं लागले. मग रुक्मिणीनें आपले हातांतील कंकण खालीं टाकून वर दोन लांकडें ठेवून गुप्तपणें पाहूं लागलीं. राका व त्याची बायको लांकडें वेंचीत त्या कंकणाजवळ आलीं; कंकण त्यांच्या दृष्टीसही पडलें परंतु त्यांनीं तें उचललें नाहीं. असें नामदेव कौतुक पाहून देवास म्हणाला—असा हा निरपेक्ष राका याला चतुर्भुज दर्शन द्यावें. नंतर देवांनीं रुक्मिणीसहित त्याला दर्शन दिलें.

## गोरा कुंभार.

तेरढोकी नांवें गांवांत गोराकुंभार म्हणून एक वैष्णव भक्त राहत असे. त्या गांवाचा तो वतनदार असून, मडकीं करून आपला प्रपंच चालवीत असे. व मुखानें श्रीपांडुरंगाचे नामाचा उच्चार करीत असे. एकेदिवशीं त्याची

बायको आपल्या लहान मुलास त्याचे जवळ ठेवून पाणी आण-ण्याकरितां घागर घेऊन गेली. त्यावेळीं गोराकुंभार माती-चा गारा करून माती तुडवीत होता व मुखानें नामस्मरण करीत होता, तों त्याचें मूल त्या मातीवर येऊन पायाखालीं मातीबरोबर चिरडून गेलें त्याचें भान त्यास मुळींच नाहीं. त्याची बायको पाणी घेऊन घरीं आली व मूल कोठें आहे ह्मणून नवऱ्यास विचारूं लागली व खालीं पाहते तों मातीवर रक्त व कातडें दृष्टीस पडलें तेव्हां शोक करून नवऱ्यास अपशब्द बोलूं लागली. तों गोरा देहावर येऊन ह्मणाला— माझ्या हृदयांत रुक्मिणीकांत बसला असतां तूं विक्षेप घालून पंढरीनाथास दवडलास असें रागानें बोलून चक्राचा दांडा घेऊन तिला मारूं लागला. तों तिनें "माराल तर विठोबाची शपथ आहे" अशी आण घातली. ती ऐकून तो नामस्मरण करीत स्वस्थ बसला. त्यावेळीं तिच्या घरीत पुष्कळ बायका पुरुषांची गर्दी झाली.ते नानाप्रकारें गोऱ्यास बोलूं लागले. परंतु गोरा त्यांचें न ऐकतां भजन करीत राहिला. पुढें कांहीं दिवस गेल्यावर त्याची बायको त्याचे पाय धुण्याकरितां गेली तिला गोरा ह्मणाला—खबरदार ! माझ्या आंगाला हात लावशील तर ? तूं मला विठोबाची आण घातली आहेस, तर तुला हात लावूं देणार नाहीं. असें नवऱ्याचें भाषण ऐकून चिंताक्रांत होत्साती मनांत ह्मणाली—आतां याचें दुसरें लग्न करून यावें ह्मणजे त्या

योगें तरी संतती वाढेल. असा विचार करून आपल्या बापाच्या घरीं गेली आणि झालेली हकीगत सांगून धाकटी बहीण माझ्या नवऱ्यास द्या ह्मणून ह्मणूं लागली. ती तिची करुणावाणी ऐकून तिच्या बापानें देण्याचें कबूल करून लग्न सामुग्री तयार करून लग्न करून दिलें. नंतर जातेवेळीं गोऱ्याचा सासरा त्याला ह्मणाला—दोनी कन्या तुमचे पदरीं घातल्या आहेत तर अधिक उणें केल्यास तुह्मांस विठोयाची शपथ आहे. असें सासऱ्याचें भाषण ऐकिलें, तेव्हां पासून त्यानें तिचाही व्यवहार बंद केला. तेव्हां त्याच्या दोनी स्त्रियांनीं एके दिवशीं गोरा निजला असतां असें केलें कीं, दोघी त्याच्या दोन बाजूस निजून गोऱ्याचा एकेक हात एकेकीनें आपल्या उरावर ठेविला. गोरा जागा होऊन मनांत ह्मणाला—अरेरे ! विषयवासनेचें ध्यान नसतां ह्या हातांनीं पापकर्म केलें तरी त्यांस शिक्षा केली पाहिजे. असा अनुताप धरून तरवारीनें दोनी हात तोडून टाकिले. सकाळीं स्त्रियांनीं गोऱ्याचे थोटे हात पाहून फारच शोक मांडला. त्यावेळीं स्त्रियांचें समाधान करून भजन करीत राहिला. पुढें आषाढी एकादशी आली, तेव्हां गोरोबा आपल्या कुटुंबासह पंढरीचे यात्रेस निघाला.तो पंढरीस येऊन चंद्रभागेचें स्नान करून पुंडलिकाचें दर्शन घेऊन क्षेत्रप्रदक्षिणा घालून महाद्वारीं आला. आणि देवास साष्टांग नमस्कार घालून आलिंगन दिलें. तेथें

गरुडपारीं नामदेवाचें कीर्तन चाललें होतें तेथें पुष्कळ लोक ऐकण्याकरितां बसले होते त्यांत गोराही ऐकण्याकरितां बसला. तेथें कीर्तनांत सर्व लोकांस टाळ्या वाजवावयास नामदेवानें सांगितलें. तेव्हां सर्व लोक टाळ्या वाजवूं लागले. त्यावेळीं गोरोबानें विठ्ठलाचा धांवा करून थोटे हात वर केले त्याबरोबर वरचेवर थोटय्या हातास पंजे फुटले. तें पाहतांच गोरोबाची ज्येष्ठ स्त्री मुलाविषयीं देवाचा धांवा करूं लागली. असें देवांनीं जाणून गोरोबाचें मूल कीर्तनांतून रांगत आणलें तें कौतुक पाहतांच सर्वांस आश्चर्य वाटलें. तें मूल गोरोबाचे स्त्रीनें घेतांच श्रोते जनांनीं जयजयकार केला. नंतर कीर्तन आटपून सर्व मंडळी आपापल्या घरीं गेली.

---

## गोष्ट १८ वी.

### विसोबाखेचर.

गोऱ्या कुंभारानें सर्व संतांस आपल्या घरीं भोजनास नेलें व त्यांची षोडशोपचारें पुजा करून भोजनास बसविलें. भोजन आटोपल्यावर विडे खात असतां, ज्ञानदेव गोऱ्यास ह्मणाला—आपल्या या मंडळीमध्यें पक्का कोण व कच्चा कोण तें मला सांगावें. तेव्हां गोरोबा एक थापटणें घेऊन प्रत्येकाचे मस्तकावर मारूं लागला. सर्वांच्या मस्तकावर मारीत मारीत आला पण कोणी कांहीं बोलले नाहीं. पण

जेव्हां नामदेवाजवळ आला त्यावेळीं नामदेव ह्मणाला—मला उगीच कां मारतां ? असें ऐकतांच गोरा ह्मणाला—या मंडळींत फक्त नामदेव मात्र कच्चा आहे. असें ऐकतांच सर्व संत हांसूं लागले; तेव्हां नामदेवास वाईट वाटलें. नंतर सर्व मंडळी आपापल्या ठिकाणीं गेली. नामदेव पंढरपुरांत येऊन त्यानें पांडुरंगाचे देवळांत जाऊन, सर्व वृत्तांत कळविला. तो ऐकून देव ह्मणाले—बरोबर आहे. जो सद्गुरूस शरण गेला नाहीं तो कच्चाच असतो. नामा ह्मणाला—देवा, तूं माझा प्राणसखा व जगद्गुरु असतां मला आणखी गुरु कशाला पाहिजे ? देव ह्मणाले—मी रामावतारीं वशिष्ठास व कृष्णावतारीं सांदीपनास शरण जाऊन आत्मज्ञान प्राप्त करून घेतलें. तरी त्वां शिवालयांत जाऊन विसोबाखेचर निजला आहे त्याला शरण जाऊन अनुग्रह घ्यावा. असें देवाचें वचन ऐकून नामदेव मल्लिकार्जुनाचे देवळांत येऊन विसोबाखेचर शिवालयांत शिवलिंगावर पाय ठेवून निजला होता, त्याला जागा करून ह्मणाला तुह्मीं साधु ह्मणवितां आणि शिवलिंगावर पाय ठेवून निजलां यांत तुमचें ब्रह्मज्ञान मला कळून आलें. विसोबा ह्मणाला—मी शक्तिहीन असल्याकारणानें माझे पाय जागेवरून उठत नाहींत तरी तूंच हे माझे पाय शिवलिंगावरून जेथें शिवलिंग नसेल तेथें ठेव. तेव्हां नामदेव त्याचे पाय धरून दुसरेकडे ठेवूं लागला, तों शिवलिंगाशिवाय तिळमात्र जागा मोकळी

दिसेना; जिकडे पाहावें तिकडे शिवलिंगेंच दिसूं लागलीं तेव्हां नामदेवास आश्चर्य वाटून चरणीं मस्तक ठेवून ह्मणाला– जिकडे पाहावें तिकडे कैलासनाथाचीं लिंगें दिसत आहेत याकरितां हे तुमचे पाय मी आपल्याच मस्तकावर ठेवतों. विसोबा ह्मणाला–श्रीशंकराची लीला कोणाच्यानें वर्णन करवणार नाहीं. मी ज्ञानदेवाचा दास आहें. असें ऐकतांच नामदेवास चिंता उत्पन्न झाली. नंतर विसोबानें नामदेवाचे मस्तकीं अभयकर ठेविला. त्यावेळीं नामदेवानें हृदयाचे ठिकाणीं पांडुरंगास ओळखिलें. एके दिवशीं सर्व संत गरुडपाराजवळ मिळाले असतां नामदेवास पांडुरंगांनीं आलिंगन देऊन ह्मटलें–त्वां गुरु केल्यापासून आह्मांस विसरलास. नामा बोलला. देवा तुझें स्वरूप हेंच सद्गुरु-स्थान आहे. माझ्या मनांत द्वैतभाव मुळींच नाहीं. नंतर देव संतांस ह्मणाले–आमचा नामदेव कच्चा आहे कीं पक्का हें सांगा पाहूं ? तेव्हां ज्ञानदेव ती खूण समजून पक्का आहे असें ह्मणाले.

## परिसा भागवत.

परिसा भागवत नांवाचा एक दरिद्री ब्राह्मण होता. त्यानें आदिमाता जी रुक्मिणी तिची आराधना करून तिला प्रसन्न केली. तेव्हां तिनें वर मागण्यास सांगितला. तेव्हां तो ह्मणाला–तुझें भजन निरंतर मला दे. असें आदिमातेनें

ऐकून एक परिस आणून त्याला दिला व ह्मणाली—हा परिस लोखंडास लाविलास ह्मणजे सोनें होईल. याला जिवापरता करूं नको. असें सांगून अदृश्य झाली. नंतर परिसा भागवतानें तो परिस आपली बायको कमळजा हिचे जवळ दिला. तीं त्यापासून सोनें करून आपला निर्वाह करीत असत पण तीं बाहेर लोकांस दुर्बळपणा दाखवीत असे. एके दिवशीं भागवताची बायको पाणी आणण्याकरितां गेली असतां, नामदेवाच्या स्त्रीची गांठ पडली. त्या दोघींचें भाषण चाललें त्यांत भागवताची स्त्री ह्मणाली—तुझा पति पांडुरंगाची स्तुति करितो; तो द्रव्य देत नाहीं मग त्याचें ध्यान कशाला करावें. माझ्या नवऱ्यानें रुक्मिणी मातेची आराधना करून तिचे पासून एक परिस मागुन घेतला आहे. तो लोखंडाला लावून आह्मीं सोनें करून पुष्कळ द्रव्यसंचय केला आहे. राजाइ ह्मणाली—परिस तो बाई कसा असतो कमळजा ह्मणाली—तुह्मीं आमच्या घरीं या ह्मणजे तो तुह्मांला दाखवीन असें बोलून दोघी आपापल्या घरीं गेल्या. दुसरे दिवशीं राजाई कमळजेकडे गेली तेव्हां कमळजेनें परिस हातीं दिला आणि सांगितलें कीं, तुह्मीं आपल्या घरीं घेऊन जा आणि लोखंडाला लावून त्याचें सोनें करून घेऊन माझा परिस मला परत आणून द्या. असें राजाईनें ऐकून तो परिस घेऊन घरीं आली व घरांतील लोखंडी सामानाला तो लावून

सोनें करून, बाजारांतून सर्व सामग्री आणून भोजन करूं लागली. इतक्यांत नामदेव घरीं आला व घरांत सामान सुमान पाहून बायकोस ह्मणाला–हें तूं कोठून आणलेंस तें सांग; नाहीं तर मी जेवणार नाहीं असें नवऱ्याचें भाषण ऐकून राजाई ह्मणली–परिसाभागवतानें रुक्मिणी मातेची आराधना करून एक परिस मागून घेतला आहे त्यापासून सोनें होतें तो मला त्याच्या बायकोनें घटकाभर दिला आहे तो मी लोखंडास लावतांच त्याचें सोनें झाले तें घेऊन बाजारांत जाऊन सामग्री आणिली आहे. नामदेव ह्मणाला–परिस कसा आहे तो मला दाखव पाहूं ! तेव्हां राजाईनें आणून दिला. तो नामदेवानें घेऊन चंद्रभागेच्या डोहांत टाकून दिला. व आपण नामस्मरण करीत राहिला. इकडे राजाई चिंताक्रांत होऊन बसली. तिकडे परिसाभागवत कमळजेस ह्मणाला—मी दिलेला परिस कोठें ठेवला. आहेस तो आण पाहूं ! कमळजा बोलली, नामदेवाची बायको राजाई दरिद्री असल्याकारणानें तिला घटकाभर दिला आहे. भागवत ह्मणाला–जा तो आतां घेऊन ये. त्याबरोबर कमळजा राजाईजवळ जाऊन परिस मागूं लागली. तेव्हां राजाई ह्मणाली–बाई ! माझ्याकडून मोठा अपराध घडला. आतांच आमचे पति येऊन घेऊन स्नान करण्याकरितां चंद्रभागेवर गेले आहेत तर ते आले ह्मणजे त्यांचे पासून घेऊन पोंचवितें. कम-

ळजा बोलली–आतांच चल माझ्या बरोबर चंद्रभागेवर. असें ऐकतांच राजाई तिला बरोबर घेऊन चंद्रभागेवर आली तों नामदेव ध्यान करीत बसला आहे. त्याला राजाई ह्मणाली–मघां परिस आणलात तो कोठें आहे द्या पाहूं ? नामदेव बोलला. तो मी चंद्रभागेंत टाकून दिला. हें त्याचें भाषण ऐकून दोघीही रडत बसल्या. तेथें पुष्कळ स्त्री पुरुषांची गर्दी झाली व काय झालें ह्मणून विचारूं लागलीं. तेव्हां राजाईनें सर्व झालेला वृत्तांत कळविला. ही बातमी भागवताचे कानावर जातांच, रडत रडत नामदेवाजवळ येऊन बोलला. तूंच माझा परीस लपवून ठेवून, नदींत टाकून दिला असें सांगतोस. तेव्हां सर्व लोक दोघांचीही निंदा करूं लागले. जे भावीक होते ते नामदेवाची स्तुति करूं लागले. नामदेव ह्मणाला–मी परिस डोहांत टाकला कीं नाहीं हें पाहणें असेल तर डोहांत जाऊन पाहा. त्यास लोक हंसून ह्मणाले–अरे तो वाळूंत गेला असेल ? आपणाला कसा बरें सांपडेल. हें असें नामदेवानें ऐकून डोहांत उडी घातली व ओंजळभर परिस बाहेर काढून ह्मणाला—यांतील तुमचा कोणता तो ओळखून घ्या. तेव्हां लोक ह्मणाले—यानें सर्व खडेच काढले आहेत तर लोखंड आणून परिक्षा करून पाहा. त्याप्रमाणें लोखंड आणून खड्यास लावतांच त्याचें सुवर्ण झालें हें पाहून सर्व लोक आश्चर्ययुक्त होत्साते नामदेवाची स्तुति करूं लागले. तेव्हां परिसाभागवत नामदेवाचे चरणा-

लागून ह्मणाला—म्यां तुमचें छळण केलें, याबद्दल माफी करून मला उपदेश द्यावा. नंतर नामदेवानें त्यास उपदेश दिला. तेव्हांपासून त्याचें परिसाभागवत असें नांव पडलें.

---

## गोष्ट १९ वी.

### जगमित्र नागनाथ.

परळी वैजनाथ या गांवांत जगमित्र नागा या नांवाचा ब्राह्मण परम भाविक असा राहत होता. तो दरिद्र असल्यामुळें गांवांत भिक्षा मागून आपलें कुटंबपोषण करीत असे. सज्जन लोक त्याची स्तुति करीत असत व दुर्जन त्याचें कधीं वाईट होईल असें इच्छित होते. तो रात्रंदिवस भजन करीत असे एके दिवशीं रात्रीं भजन आटोपल्यावर नागनाथ झोंपीं गेला आहे असें पाहून, दुर्जनांनीं त्याचे खोपटाला आग लावून दिली. तों नागा जागा होऊन पाहतो तों घर जळत असलेलें दृष्टीस पडतांच त्यानें परमेश्वराचा धांवा केला. तेव्हां त्याचें घर वरच्यावर जळून शांत झालें. प्रातःकाळीं भाविक लोक पाहूं लागले तों नाग्याचें घर जळलें आहे असें दिसलें. नंतर ते नाग्यास ह्मणाले—तुमच्यावर देवाची कृपा ह्मणूनच तुमचें कुटुंब वांचलें. मग सर्व गांवकरी जमून त्यांनीं वीस बिघ्यांचें एक शेत नागा यास इनाम दिलें. व त्याला ह्मणाले—यांत जें उत्पन्न होईल तें धर्मकारणीं लावीत जा.

त्याप्रमाणें तो धर्मकारणीं खर्च करीत असतां, एके दिवशीं दुष्ट लोकांच्या सांगण्यावरून हवालदारानें त्याचें शेत जप्त केलें. असें पाहतां भावीक लोक ह्मणूं लागले कीं धर्मार्थ दिलेलें शेत त्याचेपासून घेऊं नका हें गावकऱ्यांचें भाषण ऐकून हवालदार नाग्याचे घरीं गेला व ह्मणाला–आमचे येथें लग्न आहे तर आह्मांस वाघाचे देवक लागतें या करितां एक जिवंत वाघ आणून देशील तर तुझें शेत जप्त करणार नाहीं. असें हवालदाराचें वचन ऐकून नागा बरें आहे असें सांगुन अरण्यांत गेला. व पांडुरंगाचा धांवा करतांच देव वाघाचें रूप धरून नाग्याजवळ आले व तुला कोणी गांजलें ह्मणून विचारूं लागले; तेव्हां नागा ह्मणाला–माझा परममित्र हवालदार याचे घरीं लग्नाकरितां वाघाचें देवक पाहिजे आहे ह्मणून तुह्मांस बोलाविलें आहे. हें ऐकून देव वाघ झाले. नंतर नागा वाघास धरून गांवांत आला. त्याला पाहतांच लोक ह्मणूं लागले कीं, हवालदारास भक्षण करण्याकरितां यानें वाघास आणिलें आहे. भाविक होते ते बोलूं लागले हा वाघरूपी देव आहे. नंतर हवालदार घरीं येतांच, हवालदारानें वाघ असें पाहिल्याबरोबर तो थरथर कांपूं लागला. नागा पाहतांच बोलला–अहो, तुमचें हें दैवत घेऊन आलों. मग भिता कां? हवालदार नाग्यास हात जोडून बोलला–आतां मला जीवदान द्यावें, मी तुमची छळणा केली त्याची माफी

करावी. असें त्याचें करुणावचन एकतांच नाग्यानें वांवांस घरीं नेलें. तेथें देवांनीं चतुर्भुज रूप धरून, नाग्यास आलिंगन देऊन अदृश्य झाले. असा चमत्कार पाहतांच सर्व लोकांस आश्चर्य वाटून ते नाग्याची स्तुति करूं लागले.

## गोष्ट २० वी.

### जोगा परमानंद.

बारशी गांवांत जोगा परमानंद नांवाचा एक प्रेमळ भक्त राहत असे. तो भिक्षाटण करून आपला निर्वाह करीत असे. त्याचा नित्यक्रम असा होता कीं, दररोज ७०० नमस्कार देवास घालन गीतेचा एक श्लोक तरी ह्मणून नंतर भोजनास जावें. असा त्याचा नित्यनेम चालला असतां एके दिवशीं माहाद्वारीं व्यापारी येऊन उतरले, त्या दिवशीं पाऊस पुष्कळ पडल्याकारणानें रस्त्यावर चिखल झाला होता, त्यांतच तो नमस्कार घालीत आहे असें व्यापाऱ्यानें पाहून एक पितांबर काढून तो त्यास देऊं लागला. त्याला जोगा ह्मणाला—हें नवें वस्त्र तुमचें आह्मांस नको. एखादें जुनें असल्यास द्या. ह्मणजे आमचा योग चांगल्या प्रकारें चालेल. हा जो पितांबर आणिला आहे तो देवाला नेऊन नेसवा असें जरी सांगितलें, तरी तो व्यापारी न एकतां बळेंच त्याला तो पितांबर नेसवून दुसऱ्या गांवीं गेला. त्या दिवशीं जोगा पितांबर चिखलानें भरेल ह्मणून जपून

नमस्कार घालूं लागला. त्यामुळें त्याचे भक्तींत अंतर पडूं लागलें व त्या दिवशीं दोन प्रहर होऊन क्षुधेनें त्याचे प्राण व्याकुळ झाले; तरी नमस्कार पुरे झाले नाहींत, तेव्हां त्यानें मनांत विचार केला; तों या पितांबरामुळें सेवेंत अंतर पडलें असें त्याला समजलें. नंतर देवळाचे बाहेर येऊन चिंताक्रांत बसला असतां एक शेतकरी दोन माजलेले बैलांस लोडणीं बांधून शेतांत घेऊन जात होता. त्याला पाहतांच जोगा ह्मणाला—हे दोनहीं बैल मला द्या. त्याच्याबद्दल हा अमूल्य पितांबर तुह्मास देतों. शेतकऱ्यानें कबूल करून, दोनी बैल त्याला दिले व आपण पितांबर घेतला. मग जोगा त्या शेतकऱ्याला बोलला, आतां दोरखंड घेऊन माझे दोनी पाय जोखडाचे शिवळांस बांध व बैलांस दोन चाबुक चढवुन परत जा. असें त्या शेतकऱ्यास सांगतांच त्यानें त्या प्रमाणें केलें. त्याबरोबर दोन्ही बैल उधळून अरण्यांत गेले, त्यांच्या पाठीमागून जोगा फाजरत चालला; त्यामुळें त्याच्या आंगावरील कातडें फाजरून गेलें तरी ती व्यथा सहन करीत देवाचा धांवा करूं लागला. अशी त्याची दशा देवांनीं पाहून त्याचेजवळ आले आणि दोन्हीं पाय सोडून आलिंगन दिलें. त्याबरोबर त्याचें दिव्य शरीर झालें. नंतर तो आपल्या घरीं आला व देवांनीं देवळांत जाऊन सर्व वृत्तांत

भक्तांस कळविला. तेव्हां ज्ञानदेव हांसून ह्मणाला-देवा, तुझे लीलेस अंत नाहीं ! तूं-आपल्यापेक्षां भक्तांची कीर्ति जगांत जास्त वाढवीत आहेस.

## नरहरी सोनार.

श्रीक्षेत्र पंढरींत नरहरी सोनार नांवाचा एक शंकराचा भक्त राहत होता. त्याचा नेम असा असे कीं, प्रातःकाळीं उठून चंद्रभागेचें स्नान करून मल्लिकार्जुनाचें पूजन करून भजन करीत असे. तो ह्मणत असे कीं शंकराशिवाय दुसरा देवच नाहीं. ह्मणून तो दुसऱ्या कोणत्याही देवाचें दर्शन करीत नव्हता. त्या क्षेत्रांतील एका सावकारानें नवस केला होता कीं, जर मला पुत्र झाला तर मी रत्नजडित करगोटा तुझ्या कमरेंत घालीन. असा नवस केल्यानंतर त्याला कांहीं दिवसांनीं पुत्र झाला. तेव्हां तो सावकार देवळांत येऊन पुजाऱ्यास ह्मणाला येथें करगोटा घडून देणारा सोनार चांगल्यापैकीं कोणी आहे काय ? पुजारी ह्मणाला. नरहरी सोनाराशिवाय दुसरा उत्तम काम करणारा कोणी नाहीं. नंतर तो, सावकार नरहरीकडे येऊन सुवर्ण व रत्नें देऊन ह्मणाला-याचा देवास करगोटा करून दे. नरहरी ह्मणाला-कमरेचें माप मला आणून दे. नाहीं. तर कमजास्त झाल्यास मजकडे नाहीं मग कमरेचें माप आणून देतांच नरहरीनें मोठ्या कुशलतेनें करगोटा करून दिला तो सावकार घेऊन देवळांत जाऊन

देवाचे कमरेंत घालूं लागला तों लहान झाला तेव्हां सावकार नरहरीस येऊन बोलला. करगोटा देवाचे कमरेस लहान होतो. याकरितां किंचित मोठा करून दे. त्याप्रमाणें त्यानें किंचित मोठा करून दिला. तो कमरेस फारच मोठा होऊं लागला. तेव्हां सावकार चिंतातुर होऊन नरहरीस ह्मणाला—तुह्मीं तेथपर्यंत चला व आपल्याच हातानें कमरेंत बसवून द्या. नरहरी बोलला—माझें दैवत शंकर आहे, त्याच्याशिवाय अन्य देवास मी पाहत नाहीं. तरी मी आपल्या नेत्रांस फडकें बांधून येतों. त्याप्रमाणें डोळ्यांस फडकें बांधून देवळांत जाऊं लागला. त्याला पाहतांच सर्व लोक हांसूं लागले. मग देवळांत जाऊन देवाची कमर हातानें चाचपूं लागला; तों त्याच्या हातास शंकराची मूर्ति लागली. ह्मणून मनांत ह्मणाला—हें माझें दैवत आहे! मग मी डोळे कशाला बांधले! असें मनांत आणून डोळ्यांचें फडकें सोडून पाहूं लागला तों विठ्ठलाची मूर्ति दृष्टीस पडली. तेव्हां त्याला आश्चर्य वाटून पुन्हा डोळे बांधून चाचपूं लागला, तों शंकराची मूर्ती हातास लागली. पुन्हा डोळे उघडून पाहूं लागला तेव्हां विठ्ठलमूर्ती दिसली. नंतर पांडुरंगास नमस्कार करून ह्मणाला—देवा, तुझ्यांत व शंकरांत कांहीं भेद नाहीं. असें—मला आतां कळलें. मी आजपर्यंत द्वैतभाव मनांत धरला होता. परंतु देवा, त्वां

निरसन केलास. तेव्हांपासून पांडुरंगांनीं शिवालिंग मस्तकाचे ठिकाणीं धारण केलें.

पुढें एके दिवशीं देव नामदेवास ह्मणाले, मी सर्वांभूतीं सारखा भरलेला आहें. नामदेव ह्मणाला—देवा हें मला तूं सांगावयास नको. मीही सर्वांभूतीं सारखी दया धरितों. असें नामदेवाचें वचन ऐकून देवांनीं नामदेवाची परीक्षा पाहण्याचा विचार करून कुत्र्याचें रूप धरिलें आणि द्वादशीच्या दिवशीं यात्रेंत फिरूं लागला. कोणी जेवावयास बसले होते त्यांजवळ तें कुत्रें जातांच मारूं लागत; पण कोणी त्यास घास घालीना; तेव्हां नामदेवाजवळ येऊन त्याच्या भाकरी तोंडांत धरून पळूं लागला. हें नामदेवानें पाहतांच तुपाची वाटी घेऊन पाठीस लागून ह्मणाला—कोरड्या भाकरी खाऊं नको हें तूप घे. असें बोलून त्याच्याजवळ जाऊन आपल्या हातानें कुत्र्यास ग्रास देऊं लागला व आपणही खाऊं—लागला. असें लोकांनीं पाहतांच हांसून ह्मणाले—या नामदेवाला वेड लागलेंसें वाटतें त्यावेळीं श्वानरूपी देव हांसून ह्मणाले—मला तूं कसें ओळखलेंस ? नामदेव ह्मणाला—खेचर स्वामीच्या प्रसादवाणीनें. नंतर देव अदृश्य झाले. हें कौतुक पाहतांच सर्वजन नामदेवाचे चरणीं लागले.

पुन्हा देवांनीं विचार केला कीं, आणखी एकवेळ भक्तास कौतुक दाखवावें. नंतर देव एका दरिद्री वृद्ध ब्राह्मणाचें रूप धरून नामदेवाकडे जाऊन ह्मणाले–मला फार भूक लागली आहे, कांहीं खावयास दे. तेव्हां नामदेव नमस्कार करून 'तुमची काय इच्छा आहे' ह्मणून विचारूं लागला. देव ह्मणाले–मला थोडेंसें अन्न दे. नामदेव बोलला आतां माझेजवळ अन्न तर नाहींच. पण कांहीं तरी फलाहार देतों. देव बोलले, मला फलाहार नको. अन्नच पाहिजे. न देशील तर माझा येथें प्राण जाऊन तुला ब्रह्महत्त्या घडेल. नामदेव ह्मणाला–तुह्मीं प्राण दिला तर मीही प्राण देईन. असें नामदेवाचें वचन ऐकून देवांनीं तेथेंच प्राण सोडिला. तेव्हां शेजारचे लोक नानाप्रकारें बोलूं लागले. त्याकडे लक्ष न देतां, नामदेव त्या ब्राह्मणाचें प्रेत घेऊन चंद्रभागेवर गेला व तेथें सरण रचून त्यावर तें प्रेत ठेवून अग्नि लावून आपणही त्यावर निजला. असें पाहतांच सर्व लोकांस मोठें आश्चर्य वाटून, नामदेवासारखा एकनिष्ठ भक्त कोणीच नाहीं. असें बोलून स्तुति करूं लागले. अग्नीची ज्वाळा भडकतांच देव चटकन उठून बसले व नामदेवास आलिंगन देऊन ह्मणाले–तुजसारखा सत्वशील भक्त पृथ्वीवर मिळणार नाहीं. अशी वाखाणणी करून देव अदृश्य झाले. त्यावेळीं नामदेवाची स्तुति सर्व लोक करूं लागले.

# गोष्ट २१ वी.

## जनाबाई.

श्रीक्षेत्र पंढरपुरामध्यें कार्तिकमासीं यात्रा भरली असतां, त्या यात्रेंत जनी व तिचीं आईबापें हीं आलीं होतीं. त्या वेळीं जनीचें वय ७ वर्षांचें होतें. तेव्हां ती देवळांत येऊन पांडुरंगास नमस्कार करून कीर्तन होत होतें तेथें बसली. तेथून तिला उठावेंसेंच वाटेना. तिचीं आईबापें घरीं जावयास निघालीं, तेव्हां तिला घरीं चल ह्मणून बोलूं लागलीं. तेव्हां ती ह्मणाली—तुह्मीं घरीं जा मी येत नाहीं. असें तिचें आग्रहयुक्त भाषण ऐकून आईबापांस वाईट वाटून तीं मोठ्या दुःखानें घरीं गेलीं. इकडे जनी आईबापां शिवाय परदेशी दिसूं लागली. तिची नामदेवास दया येऊन तिला आपल्या घरीं घेऊन गेला व ह्मणाला—तुझीं आईबापें कोठें आहेत ? ती ह्मणाली—माझीं आईबापें विठ्ठलरुक्मिणी होत. त्यांशिवाय मला दुसरें कोणी नाहीं. ती नामदेवाच्या घरांतील कामधंदा करून देवाचें नामस्मरण करीत असे.

एके दिवशीं रात्रीं नामदेव आपल्या खोपटांत निजला असतां, मोठा वारा सुटून नामदेवाचें घर उडवून नेलें. हें देवास कळतांच आपलें सुदर्शन पाठवून छप्पर अडकवून धरलें. व पाठीमागून येऊन स्वहस्तानें भिंती रचून छप्पर शाका-

रलें आणि कचरा झाडूं लागला; तों नामदेव जागा होऊन बाहेर आला व देवाचे पाय धरून ह्मणाला--देवा ? आपण हें काय करीत आहां ? देव ह्मणाले—तुझें घर वारा उडवून नेत होता, तें मी आलों ह्मणून बचलें. नाहीं तर मुलांसहित तूं थंडींत खुडखुडत पडला असतास व गोणाई तुला रागावली असती. असें हें नामदेवाचें व देवाचें बोलणें गोणाइनें ऐकिलें व बाहेर येऊन देवाचे चरणीं लागली. तों जनी येऊन देवाची पाठ रगडूं लागली. देव ह्मणाले—आतां भोजन करूं या. तेव्हां गोणाईनें ताटें भरून आणिलीं व जेवावयास बसले. बाहेर जनी आपणास कोणी बोलावीत नाहीं ह्मणून कष्टी होऊन बसली आहे. तेव्हां देव नामदेवास बोलले—आज अन्नास रुची कां बरें लागली नाहीं ? नामा ह्मणाला—जनी बाहेर कष्टी होत आहे. ह्मणून अन्नास रुचि नाहीं. असें ऐकतांच देव हात धुवून एकीकडे बसले. नंतर भोजन आटपल्यावर उच्छिष्टमात्र गोणाईनें जनीस दिलें, तें घेऊन जनीनें आपल्या खोपटांत झांकून ठेवून देवाचा धांवा करूं लागली. इकडे देव व भक्त एका शय्येवर झोंपीं गेले. नामा निद्रिस्थ झाला असें देवांनीं पाहून जनीच्या खोपटांत जाऊन ह्मणाले—मला फार भूक लागली आहे; कांहीं खावयास दे. जनी ह्मणाली—माझ्याजवळ देण्यास कांहीं, नाहीं, मला उच्छिष्ट पात्र दिलें आहे तें मात्र झां-

कून ठेविलें आहे. देव बोलले तेंच घेऊन ये. मग जनीनें तें आणून देतांच देवांनीं जनीला आपल्या जवळ खावयास बसवून देव व जनी खाऊं लागलीं. नंतर पाहांट झाली असें पाहतांच देव ह्मणाले—जने ! दळावयास चल. मीही तुला दळूं लागतों. असें जनीनें ऐकून दळणाची टोपली घेऊन जातें मांडून देवाबरोबर संतांच्या ओंव्या गात दळूं लागली. तों गोणाई जागृत होऊन जनीस ह्मणाली—दुसरी बाई कोणग दळावयास आणिली आहेस ? जनी कांहींच बोलली नाहीं. ह्मणून गोणाईस राग येऊन काठी घेऊन जनीच्या खोपटांत गेली व देवाच्या मस्तकावर काठी मारली. तेव्हां देव ह्मणाले—मी विठाबाई दळण दळावयास आलें आहें. असें गोणाईनें ऐकतांच देवास मारल्याबद्दल मनांत लज्जित झाली व मी अनुचित कर्म केलें असें ह्मणूं लागली. नंतर देवांनीं पीठ भरून ठेविलें व रात्र बरीच आहे असें पाहून, जनीच्या आंथरुणावर झोंपीं गेले. इतक्यांत सूर्योदय झालेला पहातांच जनीनें देवास चटकन उठविलें. त्याबरोबर देव घाबऱ्या घाबऱ्या उठून आपली सकलाद विसरून जनीची वाकळ आंगावर घेऊन देवळांत आले. सकाळीं पुजारी पाहतात तों जनीची वाकळ देवाचे आंगावर आहे. असें पाहतांच पुजारी बोलले—नामदेवाच्या जनीनें देवाला भुलवून त्यांची सकलाद घेऊन, आपली वाकळ देवास दिली. पलातर तिच्या घरीं जाऊन

पाहूं. असें बोलून पुजारी जनीच्या घरीं आले व जनीस विचारूं लागले तेव्हां जनी ह्मणाली–मी जर देवाची वाकळ घेतली असेल तर माझे हात सडून जातील. असें जनीचें वचन ऐकतांच तिच्या घराचा झाडा घेतला. तों तिच्या खोपटांत देवाची सकलाद् सांपडली. तेव्हां तिला शूळावर देण्याची शिक्षा ठरवून शूळावर देण्याकरितां घेऊन गेले. तों त्या शूळाचें पाणी झालें. असें पाहून लोक आश्चर्य करून जनीची स्तुति गाऊं लागले. देवाची प्रीती जनीवर फारच होती. एके दिवशीं देव कागद शाई घेऊन जनीचे अभंग लिहीत बसले आहेत, तों ज्ञानदेव आले. त्यांना पाहतांच देवांनीं कागद शाई लपवून ठेविली. असें पाहतांच ज्ञानदेव देवास बोलला–आपण काय करीत होतां ? देव बोलले. मी जनीचे अभंग लिहीत होतों. ज्ञानदेव ह्मणाले–हें कृत्य आपणांस शोभत नाहीं. तुह्मांला जनीची फारच प्रीती वाटते तर चला तिच्या भेटीस जाऊं. असा विचार करून नामदेवाच्या घरीं आले. तेथें पुष्कळ संत मिळाले होते. त्यांनीं व नामदेवानें पांडुरंगास नमस्कार घातला. नंतर देव बोलले संतांच्या दर्शनाकरितां जनीस बोलावून आणावें मग गोणाईनें जनीस बोलावून आणतांच जनीनें देवांस व सर्व संतांस साष्टांग नमस्कार घातला. नंतर जनीची स्तुति करून देव ह्मणाले–जो जनीचे अभंग लिहील व तिचीं पदें वाचील त्यास मी मुक्ति देइन. असे देवाचें

वचन ऐकतांच सर्व भक्तांनीं जयजकार करून टाळ्यांचा गजर केला. मग ज्ञानदेव जनीस ह्मणाले—तूं देवास कोणत्या जन्मीं वश केलास ? तेव्हां सर्व संतांस जनी बोलली—देवांनीं जे दहा अवतार घेतले त्या प्रत्येक अवतारीं मी देवाबरोबर सेवेस होतेंच. हें तिचें भाषण ऐकतांच सर्व संतांस मोठें आश्चर्य वाटलें. नंतर देव संतांस ह्मणाले—आतां संतकविता लिहिण्याची वांटणी करूं या. ती अशी कीं, ज्ञानेश्वराचीं शब्दरत्नें चिदानंद ब्राह्मणानें. निवृत्तीचीं सोपानानें; मुक्ताबाईचे अभंग ज्ञानदेवानें, जोगापरमानंदाचे विसोबा खेचरानें; सांवत्या माळ्याचे काशा गुरवानें; चोख्या मेळ्याचे अनंतभट्ट ब्राह्मणानें आणि जनीचे पांडुरंगानें याप्रमाणें वांटण्या करून दिल्या. नंतर नामदेवानें उदक आणून सर्व संतांची षोडशोपचारें पूजा केली व विडे देऊन साष्टांग नमस्कार घातला मग सर्व गोणाईची आज्ञा घेऊन देवळांत आले.

---

## गोष्ट २२ वी.

### मच्छिंद्रनाथ.

कोणे एके वेळीं क्षीरसागराचे ठायीं शंकर रामस्वरूपाचें ध्यान करीत बसले असतां पार्वतीनें प्रश्न केला कीं, देवा, तुह्मां पेक्षां वरिष्ठ देव कोणता आहे आणि तुह्मी कोणाचे नामाचा जप करितां ? शंकर ह्मणाले—माझ्यापेक्षां वरिष्ठ

दैवत श्रीराम आहे आणि त्याचेंच मी ध्यान करीत आहें. असें वचन ऐकतांच पार्वतीस आश्चर्य वाटून ह्मणाली–मी तुमची अर्धांगी असतां मला कांहींच माहिती नाहीं, तरी तें तुमच्या मनांतील गौप्य मला कथन करावें. त्यावेळीं एकांत पाहून शंकरांनीं पार्वतीस उपदेश करण्यास आरंभ केला. तों पार्वतीस निद्रा आली. त्यावेळीं ती शुद्धीवर नव्हती. तो उपदेश मगरीच्या पोटांत गर्भ होता त्यानें ऐकिला. तोच पुढें मछिंद्रनाथ अवतरला. नंतर कांहीं दिवसांनीं मछिंद्रनाथानें विचार केला कीं, आतां तीर्थास जावें. मग तेथून निघून तीर्थें करीत. गावांत भिक्षा मागून अरण्यांत वास करीत असे. एके दिवशीं तो भिक्षा मागण्याकरितां गावांत फिरत असतां, एका सावकाराचे येथें जाऊन माते, भिक्षा वाढा; ह्मणून बोलूं लागला. तेव्हां सावकारकांता बाहेर आली व हा देदीप्यमान पुतळा पाहतांच ह्मणाली–स्वामी, आपलें आगमन कोठून झालें ! मछिंद्र ह्मणाला शून्य निरंजन जो देश तेथचा मी आहें. जो दैवाचा मनुष्य असेल तोच आह्मांस ओळखील. असें त्याचें भाषण ऐकतांच सावकारकांता ह्मणाली–स्वामी; माझ्या घरीं धनसंपत्ति असतां पोटीं पुत्रसंतान नाहीं. तरी ज्यायोगें पुत्रसंतान होईल अशी बुद्धि मला सांगा. असें तिचें भाषण ऐकतांच, मछिंद्रानें विभूति मंत्रवून तिला दिली व सांगितलें कीं, हो

भक्षण केल्यानें तुला पुत्र होईल मग सावकारकांतेनें ती विभूति देव्हाऱ्यांत नेऊन ठेविली आणि शेजारणीस सर्व ती हकीगत कळविली. त्या ह्मणाल्या—" त्या कानफाटयाच्या नादानें तूं ती विभूति भक्षूं नको; टाकून देस. ते जोगडे अशा प्रकारें विभूति देऊनबायकांना कुत्री करून बरोबर हिंडवितात " असें शेजारणींचें भाषण ऐकून तिला भीति वाटून ती राख तिनें चुलींत टाकून दिली.

पुढें बारावर्षें लोटल्यावर मछिंद्रनाथ त्या सावकाराकडे येऊन अलख पुकारून हांक मारूं लागला. तेव्हां सावकारकांता बाहेर आली व मछिंद्रास पाहतांच तिला मागील आठवण झाली. तेव्हां मछिंद्रनाथ तिला बोलला–मी बारा वर्षांमागें तुला पुत्र होण्याकारितां विभूति मंत्रून दिली होती. तिचा पुत्र कोठें आहे तो मला आणून दाखववावा. असें ऐकतांच तिनें मागील झालेली हकीगत मछिंद्रास कळविली. मछिंद्र ह्मणाला–ती विभूति तूं चुलींत टाकल्यावर चुलींतील राख कोणत्या ठिकाणीं टाकलीस तें ठिकाण मला दाखव. तेव्हां तिनें तें ठिकाण दाखविलें व मछिंद्रनाथानें " अलख " असें ह्मणतांच " आदेश " असा ध्वनि त्या जाग्यांतून निघाला. नंतर तेथील माती काढतांच बारा वर्षांच्या मुलाची मूर्ति आंतून निघाली त्याला मछिंद्रानें

हातीं धरून मार्ग चालूं लागला. गोवरीच्या भस्मांत बारा वर्षेपर्यंत राहिला ह्मणून त्याचें गोरखनाथ असें नांव ठेविलें. नंतर त्या मुलास पाहतांच सावकारबायकोस ह्मणाला–निधान आपल्या हातीं लागलें होतें; परंतु आमचें प्राक्तन विचित्र ह्मणून हातचें गेलें. मग मछिंद्र आणखीं एक पुत्र तुला होईल. असा तिला आशिर्वाद देऊन निघून गेला.

पुढें ते दोघे मार्ग क्रमण करीत असतां गोरख मछिंद्रास ह्मणाला–मला उपदेश द्यावा. मछिंद्र ह्मणाला–त्वां आमची सेवा केल्याशिवाय उपदेश देण्यास आह्मांस अधिकार नाहीं. तुझी परीक्षा पाहूं, नंतर अनुग्रह देऊं. याप्रमाणें बोलणें चाललें आहे तोंच ते एका गांवांत जाऊन उतरले. तेथें मछिंद्र गोरखास बोलला–तूं गांवांत जाऊन भिक्षा मागून आण. गुरूची अशी आज्ञा होतांच, गोरख झोळी घेऊन गांवांत फिरूं लागला. भिक्षा मागत मागत एकाचे घरीं ब्राह्मणभोजन होतें तेथें आला. त्यांनीं याच्या झोळींत वडे घातले. नंतर तेथून गुरूजवळ येऊन आणलेलें भोजन गुरूस अर्पण केलें. गुरुजीनें वडे खातांच त्यास ते फारच मिष्ट लागले. तो गोरखास ह्मणाला–मला असेच वडे उद्यां घेऊन ये. दुसरे दिवशीं गोरख झोळी घेऊन निघाला व

विचार करूं लागला कीं, काल जेथें वडे मिळाले तेथेंच जावें, दुसऱ्या ठिकाणीं जाऊन मिळणार नाहींत. मग तो त्याच घरीं जाऊन वडे मागूं लागला तेव्हां ती घरधनीन ह्मणाली–तूं वडे मागतोस ते आज कोठून देऊं. काल आमचे येथें ब्राह्मणभोजन होतें ह्मणून तुला मिळाले. आज धान्य किंवा पैसा भिक्षा देतें ती घेऊन जा गोरख ह्मणाला–मला दुसरें कांहीं नको. वडे घेतल्या शिवाय जाईन तर मला गुरूची शपथ ! असें ऐकतांच ती बाई ह्मणाली—धर्म करतां कर्म पाठीस लागतें ह्मणतात तें हें ! अरे, तूं खाद्या कुऱ्या सारखा लोचटपणा काय करतोस. गोरख बोलला–आह्मीं कुऱ्यापेक्षांही नीच आहों. पण वडे घेतल्याशिवाय जाणारच नाहीं. ती बाई बोलली—तूं आपला डोळा काढून दे ह्मणजे मी वडे देतें. असें बाईचें वचन श्रवण करून आपल्या डाव्या हाताची करांगुळी आपल्या डोळ्यांत घालून डोळा काढून बाईच्या हातावर दिला. त्या बरोबर डोळ्यांतून रक्ताच्या धारा लागल्या असें त्या घरधननीनें पाहतांच भयभीत होऊन गोरखाच्या चरणीं लागली. गोरख ह्मणाला–तूं भिऊं नको. नंतर तिनें सर्व सामग्री सिद्ध करून वडे तयार करून त्याच्या झोळींत घालून, ही बातमी कोणास बोलूं नको ह्मणून प्रार्थना केली. तेथून गोरख डोळ्यावर हात धरून

गुरूजवळ आलों व वडे पुढें ठेविले. मछिंद्रानें डोळा पाहतांच, डोळ्यास काय केलेंस ह्मणून विचारूं लागला. तेव्हां तो झालेली खरी हकीगत सांगता झाला. मछिंद्र बोलला— तर मग दुसरा डोळा मला काढून दे पाहूं ? असें गुरूचें वचन ऐकतांच, दुसरा डोळा काढून गुरुजीच्या हातावर ठेविला. असें पाहतांच गुरुजीनें त्याला उपदेश देऊन आपल्यापाशीं ठेविला.

एके दिवशीं ज्ञानदेव राउळांत जाऊन, देवाजवळ आळंदीस जाण्याची आज्ञा मागून आळंदीस आले ही खातमी चांगदेवास कळतांच तो ज्ञानदेवाचे भेटीस आला. आतां चांगदेव हा कोणाचा कोण ह्मणाल तर ब्रह्मदेवाच्या प्रथम प्रहरांत चवदा इंद्र होऊन गेले त्यांत हा चांगदेव इंद्र होता. पण ते सर्व इंद्र बंदिखान्यांत पडले असतां, एके दिवशीं नारदमुनी तेथें आले, त्यांची प्रार्थना करून चांगदेवानें यांतून माझी सुटका होईल असा उपाय सांगावा ह्मणून नारदास प्रश्न केला. तेव्हां नारद बोलला—त्वां मृत्युलोकाचे ठायीं श्रीक्षेत्र पंढरपुरीं जाऊन अवतार घ्यावा. मग नारदानें त्याला द्वादशाक्षरांचा मंत्र सांगतांच मुक्त होऊन गंगातीरीं मकरंद ब्राह्मण रहात असे त्याच्या पोटीं जन्मास आला. तीं उभयतां वृद्ध होतीं. त्यांना अशा वृद्धापकाळांत पुत्र झालेला पाहून मोठा आनंद झाला. त्याचें नांव चांगदेव असें ठेविलें. तो मोठा ज्ञा-

त्यावर त्याचें मौजीबंधन करून चौदा विद्या चौसष्ट कळा शिकविल्या व लग्नही केलें. त्याला १०० वर्षें होऊन अंतकाळ आला तेव्हां आपला प्राण ब्रह्मांडीं नेऊन वेळ चुकविली. अशाप्रकारें चौदाशें वर्षें घालविलीं. त्याचे चौदाशें शिष्य होते त्याचें इतकें सामर्थ्य होतें, पण त्यानें गुरु केला नव्हता. एके दिवशीं त्याला आठवण होऊन गुरु करावा अशी इच्छा झाली व आळंदीस जाऊन ज्ञानदेवास गुरु करण्याचा विचार करून, दउत लेखण कागद घेऊन ह्मणाला— अगोदर त्याला पत्र पाठवून उत्तर मागावें. असें बोलून ह्मणाला—आतां त्याला चिरंजीव लिहावें तर उपदेश घ्यावयाचा आहे. तीर्थरूप लिहावें तर तो माझ्यापेक्षां लहान आहे. मग कोराच कागद घडी करून शिष्याहातीं पाठविला. तो ज्ञानदेवानें पाहतांच ह्मणाला हा अजून कोराच आहे! बरें असो. नंतर उत्तर लिहून दिलें. तें चांगदेवानें पाहून वाघावर बसून सर्पाचा चाबूक हातांत घेऊन चौदाशें शिष्यांसह आळंदीस आला.

इकडे निवृत्ती, ज्ञानदेव, सोपान भिंतीवर बसले होते. त्यांना चांगदेव वाघावर बसून आपले भेटीस येत आहे असें लोकांनीं कळविलें. त्याबरोबर ज्ञानदेवांनीं भिंतीस चालण्यास हुकूम देतांच, भिंत त्यांच्यासह चांगदेवास सामोरी गेली. असें चांगदेवानें पाहतांच त्याच्या गर्वाचें खंडण होऊन, वाघावरून खालीं उतरून साष्टांग नम-

स्कार घालून वडाच्या झाडाखालीं सर्वांच्या भेटी झाल्या. तेव्हांपासून त्या स्थळास विश्रांतिवट असें ह्मणूं लागले. नंतर चांगदेवास घरीं नेलें. तेथें मुक्ताबाई आंघोळ करीत होती, तिला पाहतांच चांगदेव मागें सरला. तेव्हां मुक्ताबाई आंतून ह्मणाली—अरे मेल्या निगुऱ्या, मागें कां फिरलास ? असें. ह्मणतांच चांगदेव पुढें जाऊन मुक्ताबाईचे चरण धरिता झाला व ह्मणाला—माते ! हें तुला कसें कळलें ? मुक्ताबाई बोलली—अरे जर तुजवर गुरूची कृपा झालेली असती तर तुझ्या मनांत विकार आला नसता ! हें तिचें वचन ऐकून नमस्कार करून ज्ञानदेवाचा उपदेश घेतला.

## गोष्ट २३ वी.

### चोखामेळा.

पंढरपुरांत चोखामेळा नांवाचा ह्मार भगवद्भक्त रहात असे. त्याचा नेम असा असे कीं, चंद्रभागेचें स्नान करून नगरप्रदक्षिणा घालून महाद्वारीं येऊन भजन करून भोजनास जावें. एके दिवशीं तो देवळासमोर भजन करीत बसला असतां एक दुराचारी त्यास ह्मणाला—तुजवर जर देवाची प्रीति असती तर तुला देवांनीं देवळांत नेलें असतें तुजवर प्रीतीच नाहीं ह्मणून दर्शन होत नाहीं. मग तूं भक्ति कशाला करतोस ? चोखा ह्मणाला—जसा सूर्य

नारायण अंतरिक्षांत असून सर्वांवर प्रकाश पाडतो, त्याप्रमाणें देव लांबूनच माझें रक्षण करितो. असें बोलून घरीं गेला.

त्याचरात्रीं देव चोख्याचे घरीं जाऊन त्याला देवळांत आणून गोष्टी बोलूं लागले. देवळांत चोख्याचा शब्द होतो आहे असें ऐकून पुजारी ह्मणाले—अरे हा दरवाज्यास कुलूपें असतां आंत कसा गेला ! नंतर दरवाजा उघडून त्याला ह्मणाले—तूं देवळांत कसा आलास ! चोखा ह्मणाला मला देव घेऊन आले. तरी आतां माझेवर कृपा करून क्षमा करावी. पुजारी बोलले—तूं येऊन देवास विटाळ केलास ! तूं येथें राहूं नको, नदी पलिकडे जाऊन रहा असें त्यांचें वचन ऐकून स्त्रीसहीत नदीपलिकडे जाऊन, खोपट बांधून तेथें हरिभजन करीत राहिला. पुढें एके दिवशीं चोखा भोजन करीत असतां तेथें देव येऊन, त्याच्या बरोबर जेऊं लागले. त्यावेळीं एक पुजारी कांहीं कामाकरितां तिकडे गेला होता त्यानें हें कौतुक पाहिलें. त्या ठिकाणीं निंबाचें एक झाड होतें तेथें सावली पाहून दोघे जेवावयास बसले होते. असें पुजाऱ्याने पाहतांच त्याला राग आला व धांवत येऊन चोख्याचे एक तोंडांत मारून निघून गेला. दुसरे दिवशीं पुजारी पूजा करावयास देवळांत गेला तों देवाचा पीतांबर दह्यानें भरला आहे व एक गाल सुजला आहे असें त्याच्या दृष्टीस पडलें. तेव्हां पुजारी मनांत विस्मित होत्साता मनांत ह्मण जाणून

चोख्याकडे येऊन ह्मणाला–तूं देवाजवळ जाऊन कांहीं उपाय करून देवाला संतोषित कर. असें बोलून त्याचा हात धरून देवळांत नेलें. व त्यानें साष्टांग नमस्कार घालतांच, देवास समाधान वाटून गालाची सूज नाहींशी झाली. तेव्हांपासून चोखा दर्शनास येऊं लागला. असें सर्व भक्तांनीं पाहतांच ते देवाची स्तुति करूं लागले.

एके दिवशीं नामदेव कीर्तन करीत असतां मागें टाळकरी कोणी नव्हता असें देवांनीं जाणून आपण टाळ घेऊन मागें उभे राहिले. हें वैष्णवांनीं पाहतांच ते आश्चर्ययुक्त होत्साते ऐकावयास बसले. त्या कीर्तनांत देवास देहभान न राहून त्याचा पीतांबर सुटून खालीं लोळूं लागला असें पाहून ज्ञानदेव हांसून ह्मणाले–देवा ! तुमचा पीतांबर सुटला तो नीट नेसा. तेव्हां देव ह्मणाले—मला देवपणाचा अभिमान नाहीं. मी भक्तासारखाच होतों. असा संवाद चालला आहे तोंच काशीक्षेत्राहून कबीर आला व नमस्कार घालून संतांस भेटला आणि पांडुरंगास नमस्कार करून बसला. नंतर रुक्मिणीनें आरती पाजळून आणून नामदेवाजवळ देतांच नामदेवानें ओंवाळून कीर्तन आटोपिलें व खिरापती वांटून सर्व संत आपल्या स्थानीं गेले. तेथून कबीर, देवाची आज्ञा घेऊन रामेश्वर तीर्थास निघाला. तों वाटेंत एक नगर लागलें. तेथें कबीर वस्तीस राहून, त्या रात्रीं कीर्तन मांडलें. तें ऐकण्याकरितां गांवांतील

पुष्कळ लोक तेथें आले होते. त्यांत जीवा, तैंवा, नांवाच्या दोन ब्राह्मणांनीं कबिराची भक्ति पाहून, त्यापासून उपदेश घेतला. तेव्हां सर्व ब्राह्मणांनीं त्या दोघांस वाळीत टाकून, स्वतंत्र राहण्यास सांगितलें. त्या दोन भावांस एकास एक मुलगी व दुसऱ्यास एक मुलगा होता. तीं दोनीं मुलें मोठीं झाल्यावर त्यांस सोयरिक कोणी देईना. तेव्हां त्यांस विचार पडून आतां काय करावें ह्मणून काळजी करीत राहिले व तो बातमी कबीरास जाऊन कळविली. तेव्हां कबीर ह्मणाला–तुह्मीं दोघे आपापसांत सोयरिक करा. हें कबीराचें वचन ऐकतांच ते दोघे आपल्या गांवीं येऊन, त्यांनीं भावंडांत लग्न करण्याचा निश्चय केला. पुढें मुहूर्त पाहून लग्न लावणार, तों ती बातमी त्या गांवांतील ब्राह्मणांस कळली. तेव्हां ते यांचेकडे येऊन ह्मणाले–तुह्मीं लग्नें करता, पण सोयरिक कोठची केली ? तेव्हां त्यांनीं वरील वर्तमान त्यांस सांगितलें. तें त्यांचें भाषण ऐकतांच, ब्राह्मण आश्चर्ययुक्त हांसाने ह्मणाले–तुह्मीं असें लग्न करूं नका. आह्मीं तुह्मांस सोयरिक देतों. ब्राह्मणांनीं मनांत विचार केला कीं, आपण यांस लग्न करूं दिलें तर आपल्या जातींत अविचार होऊन बट्टा लागेल, ह्मणून त्यांस सोयरिक देण्यास कबूल झाले. नंतर त्यांनीं सोयरिक देऊन त्यांच्या मुलीचें व मुलाचें लग्न करून दिलें. ती बातमी कबीरास कळतांच तो संतोषित झाला.

# गोष्ट २४ वी.

## पद्मनाभचरित्र.

काशीक्षेत्रांत एक परमभाविक व उदार सावकार राहत असे. त्याला पांच मुलगे होते त्याच्या घरांत संपत्तीही पुष्कळ होती. त्यामुळें सर्व लोकांत त्याची मान्यता होती. पण त्यास पांडुरोग होऊन त्याच्या आंगांत किडे पडले होते; त्याची दुर्गंधी सुटत असे. त्याचेकडे कोणीही पाहत नसे. त्यानें जन्मास येऊन रामराम असें कधीं ह्मटलें सुद्धां नाहीं त्याच्या साठीं अनेक प्रकारचे उपाय करण्यांत आले; परंतु कांहीं गुण पडला नाहीं. दिवसें दिवस जास्तच होत असे. तेव्हां तो सावकार कंटाळून आप्तवर्गास ह्मणाला—आतां मला भागीरथींत नेऊन बुडवा. त्याप्रमाणें त्याला घेऊन भागीरथीवर गेले तेथें लोकांची अतोनात गर्दी जमली. त्यांत पद्मनाभ नावाचा ब्राह्मण स्नान करण्याकरितां आला होता, त्यानें त्या सावकारास विचारिलें—तूं जीव कां देतोस ? सावकार ह्मणाला—या रोगानें मी त्रासलों, उपाय पुष्कळ केले पण गुण नाहीं. तेव्हां आतां निरुपायास्तव जीव देत आहें. पद्मनाभ ह्मणाला—तूं असें करूं नको; मी एक युक्ति सांगतों तो कर. हा नरदेह पुनःमिळणार नाहीं. असें पद्मनाभाचें वचन ऐकतांच सावकार ह्मणाला—काय सांगतां तें सांगा पाहूं ? मी अगदीं त्रासलों आहें. पद्मनाभ बोलला—तूं त्रिवार 'रामराम' ह्मण-

शील तर तुझी सर्व व्यथा दूर होईल. हें विष्णुभक्ताचें वचन ऐकतांच सर्वांनीं त्रिवार रामनामाचा उच्चार केला. त्या बरोबर भावकाराचें दिव्य शरीर झालें. त्या शिवाय ज्याज्या मनुष्यांना रोग होते त्यांचीही व्यथा दूर झाली. नंतर सावकारानें त्या पद्मनाभास साष्टांग नमस्कार घातला. त्या दिवसापासून सर्व लोक पद्मनाभाचे चरण वंदून रामनामाचा उच्चार करूं लागले.

एके दिवशीं दाहाहजार वैष्णव कबीराचे घरीं आले. त्यांची शोडशोपचारें पुजा करून बसावयास आसनें दिलीं आणि तुळसीदास वाण्याचे दुकानीं जाऊन शिधासामुग्री मागूं लागला. तेव्हां तो वाणी ह्मणाला—आपली बायको एकरात्र मला देशील तर सामुग्री देतों. असें त्या वाण्याचें वचन ऐकून कबीरानें कांता देण्याचें कबूल करून सामुग्री आणून संतांस भोजन घालून तृप्त केलें. रात्र पडतांच बायकोस ती हकीगत कळवून, वाण्याकडे पोंचवून घरीं आला. मग ती स्त्री वाण्यास ह्मणाली—तुमचे उपकार आमचेवर फार झाले आहेत. तरी आपली इच्छा पुरवून घ्यावी. तो वाणी तिला आलिंगन देण्यास जाणारा तोंच, रामचंद्र कोतवालाचें रूप घेऊन, त्याचे घरीं आले व ह्मणाले—जर तिला हात लावशील तर तुला बाण मारून ठार करीन. असें ऐकतांच वाणी थरथर कांपून, नमस्कार करून ह्मणाला—तुह्मीं

मागाल तें द्रव्य देतों. पण माझा प्राण घेऊं नका. राम ह्मणाले–कबीरकांता माझी बहीण आहे, तूं असें खोटें कर्म कां करतोस ? हिला नमस्कार करून घरीं पोंचतें कर. तेव्हां वाणी आश्चर्ययुक्त होत्साता कबीरकांतेस नमस्कार करून, माते, अपराधाची क्षमा कर असें बोलून घरीं नेऊन, पोंचविता झाला. कबीर बायकोस पाहतांच ह्मणाला–तूं कां आलोस ? आतां आपल्या सत्याची हानी होईल. स्त्री बोलली–त्या ठिकाणीं गांवचा कोतवाल येऊन, वाण्यास शिक्षा करून मला घरीं पोंचतें करविलें. असें तिचें भाषण ऐकतांच कबीरास क्रोध येऊन कोतवालाकडे जाऊन ह्मणाला–तुह्मीं माझ्या सत्वाची हानी कां केली ? मी संतांकरितां वाण्यापासून सामुग्री आणून आपली बायको एकरात्र देण्याचें कबूल केलें असतां, त्वां तेथें जाऊन हा अपराध कां केला. हें कबीराचें वचन ऐकतांच कोतवाल आश्चर्यचकित होऊन ह्मणाला— तूं ह्मणतोस हें काय ? मी वाणी कोठचा पाहिला नाहीं आणि कोठें गेलों नाहीं. असें कोतवालाचें वचन ऐकतांच कबीर मनांत समजला कीं, कोतवालाचें रूप घेऊन देव आले असावे. नंतर तेथून तुळसीदासाचे घरीं जाऊन ह्मणाला–तुला कोतवालाचे रूपानें देव भेटले. असें ऐकतांच तो वाणी कबीराचे चरण धरून बोलला म्यां तुमच्या बायकोचें छळण केलें ह्मणून मला रामचंद्र भेटले. त्या

दिवसापासून त्या वाण्याला अनुताप होऊन श्रीरामाचें भजन करूं लागला व कबीर रामाचे गुणानुवाद गात घरीं आला.

---

## गोष्ट २५ वी.

### रोहिदास चांभार.

रोहिदास या नांवाचा एक चांभार विष्णूचा भक्त होता. तो प्रत्येक वैष्णवभक्तास एक जोडा देत असे. तो दररोज सकाळीं उठून भोजन करून, नंतर आंघोळ केल्यावर विष्णुची पूजा करीत असे. याचें कारण असें कीं, उपवासी ध्यान व पूजा केल्यानें मन दुसरीकडे जाऊन ध्यानांत अंतर पडतें, ह्मणून अगोदर भोजन करून, मग्न ध्यानास बसत असे.

एके दिवशीं रोहिदास देवपूजा करीत असतां, एक ब्राह्मण पंचांग सांगण्याकरितां त्याचे येथें आला. तेव्हां रोहिदासानें त्याला नमस्कार घालून आसनीं बसविलें. तेव्हां ब्राह्मण ह्मणाला—तूं चामड्याच्या आसनावर देवास बसवून विष्णुपूजा करतोस याचें कारण काय ? नानाप्रकारचीं तपें व्रतें करून विष्णु सांपडत नाहीं, त्याला तूं आपल्या चामड्यांत कसा ठेविलास. रोहिदास ह्मणाला—चामड्या शिवाय तर कांहींच नाहीं. ढोल, मृदंग, आदिकरून सर्व पदार्थ चामड्याचेच आहेत ना ? तसेंच आपलें शरीर हें

सुद्धां चामडयाचेंच आहे, मग त्याला विटाळ कां ? ब्राह्मण ह्मणाला–तूं ब्रह्मज्ञानाच्या गोष्टी सांगतोस त्या मी खऱ्या मानीत नाहीं. तूं शरीराला विटाळ ह्मणतोस तर त्यांत जीव आहे ह्मणून विटाळ नाहीं. रोहिदास बोलला–जन्म मरणाचा विटाळ धरितां परंतु तेथें उत्तम पदार्थ कोणता हें तुमचे दृष्टोस दिसत नाहीं. ब्राह्मण ह्मणाला–विष्णूची पूजा चर्मांत केल्यानें दोष घडतो. असें त्याचें भाषण ऐकतांच रोहिदास त्या ब्राह्मणास ह्मणाला–तर मग विष्णूची पूजा कोणी करावी ? ब्राह्मण ह्मणाला–आह्मीं श्रेष्ठ वर्णाचे ब्राह्मण यज्ञोपवीतधारी यांनींच करावी. आपल्या वर्णाचा अभिमान सांगतांच, रोहिदासानें रापी घेऊन पोट चिरून आपल्या पोटांत जानवें दाखविलें. तें त्या ब्राह्मणानें पाहतांच आश्चर्ययुक्त होऊन, त्याला नमस्कार करून ह्मणाला–हे विष्णुभक्ता, मी तुझें उगाच छळण केलें. तरी तूं आतां सुखानें पूजा करीत जा. असें सांगून तो ब्राह्मण आपल्या घरीं गेला.

## गोष्ट २६ वी.

### पिपाजी राजा.

गडेमंडळ नांवाच्या गांवांत पिपाजी राजा भाविक भक्त रहात होता. तो दररोज देवीची पूजा करून,

नैवेद्य त्या देवीकडून खाववून नंतर आपण भोजन करीत असे. एकेदिवशीं त्याच्या गांवीं संतमंडळी आली, त्यांचा राजानें सन्मान करून त्यांस शिधा सामग्री देऊन, आपण देवीची पूजा करून, देवी पुढें नैवेद्य ठेविला व देवीस ह्मणाला—हे माते, आतां नैवेद्य भक्षण कर. असें त्याचें भाषण ऐकतांच, देवी ह्मणाली, तुझ्या घरीं संत आलले आहेत तर ते जेवल्याशिवाय मी नैवेद्य भक्षण करणार नाहीं. त्यांच्या हुकुमाशिवाय मला नैवेद्य घेण्यास अधिकार नाहीं. अनंत ब्रह्मांडांचा नायक जो वैकुंठवासी विष्णु त्याचे ते दास आहेत. राजा ह्मणाला—तुझ्यापेक्षां थोर देव कोण आहे तें मला सांग पाहूं ? तेव्हां अंबिका ह्मणाली—रुक्मिणीकांत पांडुरंग माझ्यापेक्षां वरिष्ठ आहे. तूं संतांला शरण जा, ह्मणजे ते तुला त्यादेवाची भेट करून देतील. असें देवीचें वचन ऐकून तो राजा संतांजवळ आला आणि ह्मणाला, तुह्मीं कृपा करून मला पांडुरंगाचें दर्शन करून द्यावें. तेव्हां संत ह्मणाले—तूं रामानंद स्वामीस शरण जा ह्मणजे तुझ्या जन्माचें सार्थक होऊन तो तुला पांडुरंगाचें दर्शन करून देईल. असें ऐकतांच त्यास अनुताप होऊन आपले द्रव्य भांडार फोडून ब्राह्मणांस वांटून टाकून काशीस येऊन रामानंद स्वामीस शरण गेला, व त्याचा अनुग्रह घेतला. नंतर तेथून स्वामीची आज्ञा घेऊन द्वारकेस गेला आणि स्नान करून महाद्वारीं येऊन श्रीकृ-

ण्णाचें दर्शन घेऊन स्तुति करूं लागला. त्याची ती करुणा वाणी ऐकतांच श्रीकृष्ण साक्षात दर्शन देऊन भेटला. त्याठिकाणीं चार महिने राहून आपल्या नगरास आला.

एकेदिवशीं राजा अरण्यांतून जात असतां एक वाघ येऊन त्याच्या समोर उभा राहिला तेव्हां पिपाजी राजा त्यास ह्मणाला—अरे! तूं हें हिंसाकर्म सोडून निरंतर रामभजन करित रहा. असें ऐकतांच वाघ त्याचे चरणीं लागला. तोंच राजानें तुळशीची माळ वाघाच्या गळ्यांत घालून त्याला राममंत्राचा उपदेश दिला. नंतर वाघानें त्याला साष्टांग नमस्कार केला. तेथून राजा काशीक्षेत्रांत गेला. त्या दिवसापासून तो वाघ हिंसाकर्म सोडून झाडाचीं गळलेलीं पानें खाऊन रामनाम स्मरण करित असतां सातवे दिवशीं देह ठेविला. तोच जुनागडास नागर ब्राह्मणाचे येथें नरसिमेहता नांवानें जन्म घेईल. पाहा! संतसंगतीनें वाघास दिव्यज्ञान प्राप्त झालें, मग मनुष्यास कां बरें होणार नाहीं? याकरितां निस्सीम भक्तीनें संतांस शरण जावें.

---

## गोष्ट २७ वी.

### नरसीमेहता.

जुनागडामध्यें एक नागर ब्राह्मण रहात असे, त्याला

एक मुलगा होता. त्याचें नांव नरसीमेहता असें ठेविलें होतें. तो मुलगा सात वर्षांचा होतांच, त्याचीं आईबापें मरण पावलीं. तेव्हां चुलतभावानें त्याचा प्रतिपाळ केला. तो एके दिवशीं खेळ खेळून घरीं येऊन आपले भावजई जवळ पाणी मागूं लागला. तेव्हां ती रागानें नानाप्रकारें दुर्वचनें बोलून काय काम करून आलास? असें ह्मणूं लागली. त्याबरोबर त्याच्या मनाला पश्चात्ताप होऊन, तसाच रागानें निघाला आणि गांवापासून दोन कोशांवर एक अरण्य होतें तेथें गेला. तोंच एक शिवालय त्याचे दृष्टीस पडलें. त्यांत प्रवेश करून शंकरास नमस्कार घातला व सात दिवस पर्यंत त्या देवळांत शंकराची आराधना करूं लागला. आठवे दिवशीं शंकर प्रगट होऊन ह्मणाले-मुला, मी तुला प्रसन्न झालों; तुझी काय इच्छा आहे ती मला सांग; नरसीमेहता ह्मणाला-प्रभो, तुह्मांला जें आवडेल तें मला द्यावें. असें ऐकतांच शंकरास आश्चर्य वाटून ह्मणाले-बाळा, मला श्रीकृष्ण मनापासून आवडतो, तर त्या क्रीडा दाखवितों तूं मज बरोबर चल. असें सांगून शंकरानीं त्याला कालिंदीतटावर आणिलें. तेथें येऊन उभयतांनीं श्रीकृष्णाचें दर्शन घेतलें. नंतर श्रीकृष्णाचे सभोंवतीं सर्व गोपी जमून नानाप्रकारचे खेळ खेळूं लागल्या. श्रीकृष्ण नरसिमेहत्यास पाहतांच शंकरास ह्मणाले-आज हा नवीन मनुष्य अपणाबरोबर कोण आला आहे?

शंकर नरसीमेहत्याला ह्मणाले, तूं श्रीकृष्णाचे चरण धर. असें सांगतांच नरसीमेहत्यानें श्रीकृष्णचरणावर मस्तक ठेविलें. तेव्हां श्रीकृष्णांनीं त्याच्या मस्तकावर वरदहस्त ठेविला. नंतर शंकर कैलासीं गेले. नरसीमेहता श्रीकृष्णाबरोबर देवळांत जाऊन निरंतर श्रीकृष्णलीला गात राहिला.

त्याचा चुलतबंधु त्या ठिकाणीं येऊन, नरसीमेहत्याला घरीं घेऊन आला. तरी तो गांवांतही कीर्तन करूं लागला. त्याचें कीर्तन ऐकून सर्व नगरवासी संतुष्ट झाले. त्या गांवांत एक ब्राह्मण विष्णूचा भक्त होता, त्याला एकच कन्या होती. ती नरसीमेहत्याला देऊन त्याचें लग्न केलें. तिजपासून पुढें कांहीं दिवसांनीं नरसीहमेत्याला एक मुलगी व एक मुलगा अशीं दोन अपत्यें झालीं आतां कित्येक वाचक या ठिकाणीं अशी शंका घेतील कीं, कलियुगांत गोपींसह श्रीकृष्ण क्रीडा करावयास कसे आले? तर या शंकेचें निवारण असें कीं, श्रीकृष्णानें असा वर दिला आहे कीं, जे माझे आवडते प्रिय भक्त आहेत, त्यांस मी गोकुळवृंदावनाचे ठायीं दृष्टीस पडेन, त्यामुळेंच नरसीमेहत्यास कृष्णक्रीडा दृष्टीस पडली

## गोष्ट २८ वी.

### नरसीमेहत्याचे मुलाचें लग्न.

शामपुतरांत त्रिपुरांतक नांवाचा एक सावकार होता. त्याला

एक कन्या होती. ती उपवर झाली असें पाहतांच, त्या सावकारानें आपल्या पुरोहितास वर शोधण्याकरितां पाठविला. तो नरसीमेहत्याचे घरीं येऊन ह्मणाला–तुमच्या मुलास त्रिपुरांतक सावकारनें आपली मुलगी अर्पण केली आहे. तरी आपण उद्यां लग्नाची तयारी करावी आणि लग्नास यावें. असें सांगून तो शामपुरास येऊन सावकारास वर्तमान सांगूं लागला तेव्हां नगरजन व यजमान ह्मणूं लागले कीं तो साधु हरिकीर्तन करणारा आह्मांस सोयरा नको. असें ऐकतांच पुरोहित ह्मणाला–तुह्मीं नको ह्मणतां; पण मी लग्ननिश्चय करून आलों आहें. तुह्मीं कन्या देत नसाल तर मला आपली एक करांगुली त्यास कापून दिली पाहिजे. आणि ती मी कापून देईन असें ऐकतांच सावकार ह्मणाला–तो एकटा आणि उद्यांच तयारी, शिवाय लग्नास कसा येईल ? पुरोहित ह्मणाला–परमेश्वरकृपेनें सर्व कांहीं होईल व लग्नघडी उद्यांचीच मी ठरवून आलों आहें.

दुसरे दिवशीं नरसीमेहत्यानें प्रातःकाळीं उठून स्नान करून श्रीकृष्णाचें पूजन केलें आणि मुलगा बायको यांस बरोबर येऊन तो मार्गानें श्रीकृष्णाचे गुणानुवाद गात चालला. इकडे द्वारकेंत श्रीकृष्ण रुक्मिणी एकांतांत बसलीं असतां, कृष्ण रुक्मिणीस ह्मणाले–प्रिये; नरसीमेहत्याचे मुलाचें आज लग्न आहे. तरी त्याच्या कार्यांत जाऊन आपणांस सर्व

तयारी केली पाहिजे असें सांगून सर्व भक्तमंडळी, गोप, गोपिका, अष्टनायिका इत्यादि बरोबर घेऊन श्रीकृष्ण नरसीमेहत्याचे पुढें चालले आणि पुढें मनुष्य पाठवून त्रिपुरांतकास बातमी दिली. ती ऐकतांच त्या सावकारास आश्चर्य वाटलें. नंतर तो आप्तजनांसह वरास समोरा जाऊन मंडपांत घेऊन आला. नवरा नवरीस हळदी लावून लग्न लाविलें तेथें पांच दिवस ब्राह्मणभोजन होऊन सर्वांस वस्त्रालंकार देऊन संतुष्ट केलें. तेथून श्रीकृष्ण व नरसीमेहता जुन्यागडीं आले. तेव्हां श्रीकृष्णानें नरसीमेहत्यास असें सांगितलें कीं तुला ज्यावेळीं संकट पडेल, त्यावेळीं माझें चिंतन कर. असें सांगून श्रीकृष्ण वऱ्हाडी मंडळासह द्वारकेस आले.

---

## गोष्ट २९ वी.

### देव नरसीमेहत्याची हुंडी भरितो.

एके वेळीं द्वारकेस यात्रा चालली असतां त्या यात्रेबरोबर केशवभट नांवाचा एक भाविक ब्राह्मणही निघाला. त्याचे अवळ सातशें रुपये होते, ते मार्गांतील चोरांच्या धास्तीमुळें कोणाजवळतरी ठेवून हुंडी लिहून घेण्याचा विचार करून ती जुनागडांतील लोकांस कोणी सावकार येथें आहे काय म्हणून विचारूं लागला. ते निंदक लोक नरसीमेहत्याचें घर

दाखवून ह्मणाले—त्याचे कडे जा ह्मणजे तुझें काम होईल असें ऐकतांच, तो केशवभट नरसीमेहत्याकडे जाऊन बोलला—आह्मांस द्वारकेस जाणें आहे तर हे आमचे जवळील सातशें रुपये घेऊन आह्मांस हुंडी लिहून द्या. असें ऐकतांच आश्चर्य वाटून, नरसीमेहता ह्मणाला—हो, द्या रुपये. आमचा सांवळा नांवाचा गुमास्ता द्वारकेंत आहे; त्याचे पासून तुम्हीं रुपये घ्या. असें ऐकून केशवभटानें सातशें रुपये त्याच्या पदरांत घालून हुंडी लिहून घेतली. त्याचवेळीं नरसीमेहत्यानें गांवांतील ब्राह्मण व भक्त यांस बोलावून ते सर्व रुपये वांटून टाकले. असें पाहतांच तो ब्राह्मण आश्चर्यचकित होत्साता मनांत ह्मणाला—मी याच्याजवळ व्यवहार केला खरा, पण पुढें काय होईल कोण जाणें ! असें मनांत म्हणत द्वारकेंत आला व गोमतीचें स्नान करून श्रीकृष्णदर्शन घेतलें. नंतर पूजारी यांस सांवळा गुमास्ता कोठें राहतो म्हणून विचारूं लागला. तेव्हां पुजारी म्हणाले—सांवळा गुमास्ता या गांवांत कोणी नाहीं. असें ऐकून तो ब्राह्मण चिंताक्रांत होत्साता बिऱ्हाडास येऊन बसला. इकडे देवानें सांवळ्या गुमास्त्याचें रूप धारण करून रथ तयार केला व त्यांत द्रव्य भरून, त्या ब्राह्मणाच्या बिऱ्हाडाजवळ येऊन रथ उभा केला. व त्या ब्राह्मणाला चिंताक्रांत होण्याचें कारण विचारूं लागला. तेव्हां ब्राह्मण म्हणाला—सांवळा नां-

चा एक गुमास्ता येथें राहतो त्याच्या नांवानें हुंडीपत्र नरसीमेहत्यानें दिलें आहे. त्याच्या पासून मला सातशें रुपये घ्यावयाचे आहेत. त्याचा येथें शोध केला पण कोठेंच पत्ता लागत नाहीं. असें ऐकतांच देव म्हणाले—सांवळा गुमास्ता तो मीच. आणा पाहुं हुंडीपत्र. असें ऐकल्याबरोबर त्या ब्राह्मणास हुशारी आली व हुंडीपत्र देवास दिलें. देवानें तें घेऊन रुपये त्याच्या स्वाधीन केले तेव्हां तो ब्राह्मण ह्मणाला—कायहो ? तुम्ही नरसीमेहत्याचे नोकर असतां श्रीमंतासारखे दिसतां आणि नरसीमेहता दुर्बळ दिसतो याचें कारण काय ? देव ह्मणाले—अहो, जे विष्णुभक्त असतात ते कशाचीही आशा बाळगीत नाहींत. असें सांगून देव अदृश्य झाले. नंतर ब्राह्मणानें द्रव्य मोजून पाहिलें तें अगणीत भरलें. असें पाहतांच त्या ब्राह्मणाला आश्चर्य वाटून श्रीकृष्णच भेटल्याबद्दलची त्याची खात्री झाली. तेव्हां त्याला अनुताप होऊन तें द्रव्य याचकांस वांटून, तो ब्राह्मण श्रीकृष्णास वंदन करून, नरसीमेहत्याचे गांवीं येऊन, त्याला सर्व वर्तमान सांगता झाला. त्या दिवसापासून तो ब्राह्मण नरसीमेहत्याबरोबर भजन करित राहिला.

---

## गोष्ट ३० वी.

### नरसीमेहत्याच्या मुलीचें ओटभरण.

पुढें कांहीं दिवसांनीं नरसीमेहत्याच्या मुलीला न्हाण

आलें त्यावेळीं तिच्या सासऱ्यांहून ओंटीभरण्यास येण्याबद्दल निरोप आला. तेव्हां नरसीमेहत्याचे बायकोस अहेराची तजवीज कशी होते, अशाबद्दल मोठा विचार पडला. तिनें आपल्या नवऱ्यास कळविलें. तेव्हां तो ह्मणाला—त्याची काळजी पांडुरंगाला आहे तूं स्वस्थ बैस. असें सांगून तो मुलीच्या सासऱ्यांस गेला. तिकडील मंडळीनें याचेजवळ टाळ आणि वीणा या शिवाय कांहीं नाहीं; असें पाहतांच, सर्वजण त्याची चेष्टा करूं लागले. ते ह्मणाले—याच्याजवळ अहेरास कांहीं नव्हतें तर मग रिकाम्या हातानें आला कशाला ? अशा प्रकारें बोलूं लागले. त्याचा व्याही श्रीमंत असल्यामुळें त्याचे येथें सोयरे धायरे मोठ्या थाटानें पुष्कळ आले होते. त्यांनीं हा दरिद्री व्याही रिकाम्या हातानें आलेला पाहतांच त्यांस फार वाईट वाटलें.

सर्वांचें जेवणवगैरे आटोपून पानसुपारी खात बसले असतां एक चेष्टेखोर मनुष्य नरसीमेहत्यास ह्मणाला—कायहो, व्याही ! तुम्हीं अहेर काय आणला आहे तो बाहेर काढा पाहूं ? नरसीमेहता ह्मणाला—कोणाला काय काय पाहिजे, त्याची यादी करून मला द्या. ह्मणजे त्या प्रमाणें आहेर करण्यास ठीक पडेल. असें ऐकतांच त्या चेष्टेखोरानें कागद दऊत पुढें आणून यादी करण्यास घेतली. सर्वांस विचारून यादी झाल्यावर, यादी लिहि-

णारास ह्मणाला–तुला काय पाहिजे ? तेव्हां तो थट्टेनें ह्मणाला–मला एक दगड पाहिजे. तोही यादींत लिहिला. इतका प्रकार झाल्यावर सर्व मंडळी खदखदां हांसून ह्मणाली–हा भिकारडा अहेर कोठून आणतो तें पाहावें. असें जरी तें लोक बोलत होते, तरी त्या बद्दल नरसीमेहत्याच्या मनांत कांहींच नाहीं. पण त्याची मुलगी दाराआडून पाहत होती ती मात्र अगदीं लज्जित झाली होती. त्यावेळीं नरसीमेहत्यानें मनांत पांडुरंगाचा धांवा केला तो ऐकतांच दुर्वासभोजनाचे वेळीं द्रौपदीनें केलला धांवा ऐकून जसा श्रीकृष्ण धांवत आला; त्याचप्रमाणें यावेळीं भक्ताची प्रेमळ करुणावाणी श्रवणीं पडतांच, देव व्यापाऱ्याचा वेष घेऊन कापडाची दिंडी घेऊन तेथें आले. त्यास पाहतांच मंडळी ह्मणाली आपण कोण आहां ? व्यापारी ह्मणाला–मी द्वारकेंतील नरसीमेहत्याच्या पेढीवरील गुमास्ता आहें. असें सांगून त्यानें कापडाची दिंडी व दागिन्याचे करंडे पुढें ठेविले. नंतर यादींत लिहिल्याप्रमाणें सर्वांस आहेर दिले. शेवटीं यादी करणाराचे नांवाचा दगड काढून तो त्याच्या डोक्यावर ठेविला. असा प्रकार पाहतांच सर्व मंडळी आश्चर्यानें गर्क झाली व नरसीमेहत्या जवळ छळणा केल्याबद्दल क्षमा मागूं लागले. तेव्हांपासून त्याला पांडुरंग साह्य आहे अशी सर्व मंडळीची खात्री झाली.

---

# गोष्ट ३१ वी.

## रामदास स्वामी.

डाकुरांत रामदास नांवाचा एक भाविक भक्त राहत होता. तो दररोज भिक्षा मागून आपल्या कुटुंबाचा निर्वाह करीत असे व तो पंधरा दिवशीं प्रत्येक एकादशीस द्वारकेस जात असे. त्याने पंचवीस वर्षेपर्यंत द्वारकेची वारी केली. पुढें त्याचें शरीर अगदीं शक्तिहीन झालें होतें त्यामुळें वारीस जाण्याची शक्ति त्याच्या आंगीं राहिली नाहीं ह्मणून तो शेवटच्या वारीस देवाची प्रार्थना करून ह्मणाला-देवा, आतां माझें येणें होणार नाहीं, जसा माझेवर लोभ आहे तसाच ठेवावा. असें भक्ताचें वचन ऐकतांच देव गहिंवर युक्त होत्साते आलिंगन देऊन ह्मणाले-तूं आपली काया झिजवून माझेवर सेवेचें ऋण केलेंस. या करितां मी तुझेच गांवास येतों, रामदास ह्मणाला तुह्मांला येथून कसें नेतां येईल ? देव बोलले-रथाला घोडे जुंपून रातोरात जाऊं. असा एकमेकांचा विचार होऊन रात्रीं रथ जुंपून रथांत बसून डाकुरास आले. तेथें रामदासानें देवाच्या शोधाला कोणी येतील ह्मणून देवाला तळ्यांत टाकून ठेविला. प्रातःकाळीं पुजारी पाहतात तों देव जाग्यावर नाहीं ह्मणून पाहू लागले; तों रथाचा मार्ग दृष्टीस पडला. त्या अनुरोधानें पुजारी डाकुरास येऊन रामदासास विचारूं लागले. तेव्हां रामदासानें कानावर हात ठेविले व

म्हणाला—मला माहीत नाहीं, तुम्हास पाहिजे तर आमचा म्हाडा घ्या. म्हणून पूजारी सर्व ठिकाणीं शोधूं लागले पण कोठें थांग लागेना. शेवटीं विहिरी, तळीं यामध्यें भाले खोचून पाहूं लागले. तेव्हां तळ्यांत देवाच्या आंगास भाला लागतांच रक्ताचा लोट पाण्यावर आला. असें पाहतांच पुजाऱ्यानें बुडी मारून देवास बाहेर काढिलें व रथांत बसवून द्वारकेस घेऊन चालले. त्यावेळीं रामदास चिंताक्रांत होऊन देवाचा धांवा करूं लागला, तेव्हां देव म्हणाले—रामदासा, तूं चिंताकरूं नको मी तुझ्याजवळ निरंतर राहीन. तूं मला पुजाऱ्यापासून, माझ्या भारंभार सोनें द्यावयास करून मला विकत घे. रामदास म्हणाला—देवा, तुझ्या भारंभार सोनें द्यावयास माझे जवळ कोठें आहे ? देवांनीं सांगितलें, तुझ्या बायकोच्या नथींतील सुवर्णा इतका मी होईन. असें ऐकून रामदास पुजाऱ्याजवळ येऊन म्हणाला, ही मूर्ती तुम्हीं नेऊं नका, या मूर्तीच्या भारंभार सोनें मी तुम्हांस देतों. ही मूर्ती विकत द्या. असें ऐकून पूजाऱ्यानीं ती गोष्ट मान्य केली. नंतर रामदास घरीं जाऊन बायकोच्या नाकांतील नथ काढून आणून एका पारड्यांत देवास व एका पारड्यांत नथ घातली. त्याबरोबर दोनी पारडीं सारखीं होऊन देवाचें पारडें वर गेलें. असें पाहतांच सर्वजन रामदासाची स्तुति करून वंदन करूं

लागले. नंतर पुजारी ती वालभर सोन्याची नथ घेऊन द्वार-केस आले आणि नवीन मूर्ति करून स्थापना केली. व राम-दासानें घेतलेली मूर्ति डाकुरासच राहिली.

## गोष्ट ३२ वी.

### ब्रह्मचारी व कल्याण

हरिद्वार क्षेत्रांत कल्याण नांवाचा एक ब्राह्मण रहात असे. त्याला दोन मुलें होतीं. तो तीर्थयात्रा करीत करीत शिवरात्र पर्वकाळीं रामेश्वरीं आला. तेथें एका ब्रह्मचाऱ्याची व याची गांठ पडली. त्या उभयतांनीं शंकराची प्रार्थना करून दर्शन घेऊन परत मथुरेंत आले. तेथें कल्याण हिंवज्वर लागून आजारी पडला. त्याची शुश्रूषा जरी ब्रह्मचाऱ्यानें उत्तम ठेविली होती तरी त्यानें केलेले सर्व उपाय व्यर्थ जाण्याची वेळ आली तथापि ब्रह्मचाऱ्यानें धीर सोडला नाहीं. असे सहा महिने लोटले ब्रह्मचारी त्याचे जवळ बसून रामकृष्णाचें नामस्मरण करीत असे. त्या योगें त्याचा रोग जातांच तो ब्राह्मण ब्रह्मचाऱ्यास ह्मणाला—तुझे उपकार माझ्यानें जन्मभरही फिटणार नाहींत. तरी माझी एक मुलगी आहे ती मी तुला देतों. असें ऐकतांच ब्रह्माचारी ह्मणाला—नको नको, मला तो संसारताप नको. मी आतां लग्न करण्याचा निश्चय केला आणि पुढें जर न केलें तर माझें ब्रह्मचर्य व्रत

व्यर्थ जाईल. कल्याण ह्मणाला—हें जर तुला खोटें वाटत असेल तर श्रीकृष्णाला साक्ष ठेवूं. असें बोलून दोघेही माहाद्वारीं येऊन, श्रीकृष्णाला वंदून कल्याणानें ब्रह्मचाऱ्याच्या हातावर कन्यादान केल्याचें उदक सोडलें आणि श्रीकृष्णास साक्षी ठेविलें. नंतर तेथून हरिद्वारीं आले. कल्याणब्राह्मण झालेला वृत्तांत बायकोस सांगूं लागला. तेव्हां तिनें त्यास सांगितलें कीं, माझी कन्या मी अशा या हरिभक्तांना कधींच द्यावयाची नाहीं. तुह्मांला द्यावयाची असेल तर दुसरें लग्न करा आणि तिच्यापासून जी कन्या होईल ती त्याला द्या असें बायकोचें वचन ऐकून ब्राह्मण राजद्वारीं जाऊन त्यानें राजास सर्व झालेला वृत्तांत कथन केला. तो ऐकून राजा ह्मणाला—या गोष्टीला कोणी साक्ष ठेविला आहे काय ? असें ऐकतांच ब्रह्मचारी ह्मणाला—मथुरेचा श्रीकृष्ण साक्ष आहे. हें ऐकून राजास आश्चर्य वाटून, राजानें सांगितलें कीं त्या मथुरेच्या श्रीकृष्णाला येथें घेऊन ये ह्मणजे मी तुझें लग्न करवून देतों. हें वचन ब्रह्मचाऱ्यानें ऐकून श्रीकृष्णास साक्षी आणतों असें सांगुन निघाला. तिसऱ्या दिवशीं मथुरेंत येऊन श्रीकृष्णाचें दर्शन घेऊन ह्मणाला—देवा आतां माझ्या बरोबर साक्ष द्यावयास चला. नाहीं तर माझें ब्रह्मचर्य व्रत फुकट जातें, आज पर्यंत तुमच्या आश्रयानें राहिलों

तरी माझा सांभाळ केलाच पाहिजे. असें ऐकतांच देव ह्मणाले—चलतर तूं पुढें. मी तुझ्या मागून येतों; पण तूं मागें मात्र पाहूं नको. जर तूं मागें पाहशील तर मी त्याच ठिकाणीं उभा राहीन. नंतर ब्रह्मचारी पुढें व श्रीकृष्ण मागें असे रातोरात हरिद्वाराजवळ आले. गांव पुढं अर्धाकोस आहे तोंच ब्रह्मचाऱ्यानें मागें पाहिलें. त्याबरोबर श्रीकृष्ण तेथेंच उभा राहून ह्मणाला–कां, मी तुला काय सांगितलें होतें? कीं तूं मागें पाहशील तर मी तेथेंच उभा राहीन. त्याप्रमाणें मी येथेंच उभा राहतों. तूं राजाला माझ्याजवळ घेऊन ये जा. असें ऐकून ब्रह्मचारी राजा जवळ देव आल्याबद्दल सांगूं लागला तें ऐकतांच सर्वजनास मोठें आश्चर्य वाटून, राजा वाद्यगजरानें देवास लोटांगण घालीत चालला. तेव्हां एकच जयजयकार झाला. नंतर कल्याणब्राह्मणानें सर्व साहित्य गोळा करून लग्नाची तयारी केली. राजानें पांच कोस पर्यंत मंडप देऊन मोठ्या थाटानें लग्न करून दिलें. तो सोहाळा पांच दिवस होऊन श्रीकृष्णमूर्ती तेथेंच राहिली. व मथुरेला नूतन मूर्ति स्थापन केली दक्षिणदेशीं पंढरीक्षेत्र, पश्चिमेस द्वारका, उत्तरेस हरिद्वार आणि पूर्वदेशीं जगन्नाथ याक्षेत्रीं श्रीकृष्ण निजभक्तांची वाट पाहत राहिला आहे.

# गोष्ट ३३ वी.

## सूरदासचरित्र.

सूरदास हा अक्रूराचा अवतार. तो श्रीकृष्णशापानें जरी गर्भांध झाला होता तरी रात्रंदिवस श्रीकृष्णाचें भजन करीत असे. एके दिवशीं तो मथुरेंत येऊन श्रीकृष्णाचें दर्शन घेऊन, त्याची स्तुति करूं लागला. त्याची ती करुणावाणी श्रीकृष्णानें ऐकून, त्यास दृष्टि देऊन भेट दिली आणि ह्मणाले—मी तुला प्रसन्न झालों.कांहीं वर माग.असें ऐकतांच सूरदास बोलला–देवा, तुझें स्वरूप पाहून मी संतोषित झालों. आतां माझे नेत्र पहिल्याप्रमाणेंच आंधळे कर. असें ऐकतां देवास हांसूं आलें व नेत्र पूर्ववत झाले. नंतर सूरदास रात्रंदिवस तेथेंच राहून हरिभजन करूं लागला. पुढें असा चमत्कार झाला कीं–अवंती नगरींत भीमक नांवाचा एक राजा होता. त्याच्या पदरीं पांचशें गवई होते. त्यांत तानसेन ह्मणून एक मुख्य गवई होता. त्याची राजा फार वाखणणी करीत असे. तेव्हां तानसेन ह्मणाला—महाराज, या पृथ्वीवर मीच मोठा गवई आहें असें नाहीं. माझ्यापेक्षां आणखीं पुष्कळ आहेत. असें ऐकतांच राजानें विचारलें, तानसेना, तुझ्यापेक्षां दुसरा वरिष्ठ गवई कोण आहे तें सांग पाहूं? तानसेन बोलला-मथुरेंत सूरदास नांवाचा एक गवई सर्वराग रागि-

ण्यांत प्रवीण आहे. असें ऐकून राजानें त्याला सेवक पाठवून बोलावून आणिलें व त्याची पूजा करून आसनावर बसविलें. नंतर तो हरिकीर्तन गाऊं लागला. तें ऐकून सर्व मंडळी चकित झाली. राजानें सूरदासास एक महिना ठेवून घेतला. एके दिवशीं राजा मंदिरांत गेला त्याची स्त्रियांनीं प्रार्थना केली कीं, आमची सूरदासाचें गायन ऐकण्याची इच्छा आहे. त्याप्रमाणें राजानें त्यास अनुमोदन दिलें. दुसरे दिवशीं त्याचें कीर्तन स्त्रिया ऐकण्याकरितां बसल्या असतां, त्यांत श्रीकृष्णानें शापिलेली सत्यभामा सत्राजिताची मुलगी दासी झालेली होती. तिनें कीर्तन ऐकतांच ती तल्लीन होत्साती पुढें येतांच सूरदासाची दृष्टि साफ होऊन, त्यानें डोळे उघडले. त्याबरोबर सर्व राजस्त्रिया लज्जित होऊन पडदे टाकून लपून बसल्या. तोच तेथें श्रीकृष्ण प्रगट होऊन त्यानें सूरदासास व सर्व दासीस आपल्या स्वरूपीं मिळविलें.

---

## गोष्ट ३४ वी.

### सेना न्हावी.

दिल्ली शहरांत सेनान्हावी नांवाचा एक भगवद्भक्त रहात असे. तेथील बादशाहा त्याच्या शिवाय कधींही हजामत करीत नसे. एके दिवशीं तो सेना स्नान करून देवपूजेस बसला असतां, राजाचें बोलावणें आलें, त्यास सेन्याच्या

बायकोनें ' घरीं नाहींत ' ह्मणून सांगितलें. ह्मणून आणखीं दोन तीन बोलावणीं राजानें पाठविलीं त्यांसही घरांत नाहींत असाच जबाब मिळाला. ती बातमी शेजारीं राहणाऱ्या कुटिल लोकांस कळतांच त्यांनीं बादशाहाचे दरबारीं जाऊन सेना पूजा करीत बसला आहे असें सांगितलें. तेव्हां बादशाहाला क्रोध येऊन सेवकांस आज्ञा दिली कीं, " त्याला धरून मोटबांधून नदींत बुडवून टाका. " हें वर्तमान भक्तवत्सल पांडुरंगास कळतांच,तो सेनान्हाव्याचें रूप घेऊन कांखेस धोकटी लावून बादशाहा समोर आला. त्यास पाहतांच राजाचा कोप शांत झाला व समाधान पावला. नंतर बादशाहाची हजामत वगैरे झाल्यावर तेलाची वाटी घेऊन, सेनारूपी देव तैलमर्दन करूं लागला. त्या वाटींत पांडुरंगाचें शंख, चक्र, गदा, पद्म इत्यादिकांनीं युक्त चतुर्भुज रूप हजामत करीत आहे, असें बादशाहास दिसूं लागलें. तें पाहतांच बादशाहा चकित होऊन वर पाहूं लागला. तों सेनान्हावीच हजामत करीत आहे, असें दिसलें. त्यावेळीं बादशाहाचें देहभान जाऊन मोहित झाला व एक ओंजळ होन सेन्यास दिले. ते घेऊन धोकटींत टाकले व धोकटी सेन्याचे घरीं ठेवून देव गुप्त झाले.

बादशाहाला त्या चमत्काराबद्दल मोठें आश्चर्य वाटून पुनः दोनप्रहरीं सेन्याला बोलावणें पाठविलें तो येतांच

बादशाहा ह्मणाला—सेन्या, तूं सकाळीं तेलाच्या वाटींत जें चतुर्भुजरूप दाखविलेंस तेंच आतां दाखव पाहूं ? असें बादशाहाचें भाषण ऐकतांच सेन्याला मोठें नवल वाटलें व बादशाहाच्या आग्रहामुळें वाटींत तेल घेतलें; परंतु तें चतुर्भुजरूप दिसेना. तेव्हां सेना मनांत समजला कीं भक्त संकट निवारणारा पांडुरंगच माझें रूप घेऊन आला असावा. असें जाणून बादशाहास कळविलें. तरी तें बादशाहास खरें वाटेना. बादशाहा सेन्यास बोलला—तूं जर सकाळीं दाखविलेलें चतुर्भुज रूप आतां न दाखविशील तर मी तुला शूळावर देईन. असें ऐकतांच सेन्यास विचार पडून त्यानें भगवंताचा धांवा केला. तोंच वाटींत सकाळच्या प्रमाणेंच चतुर्भुज रूप दिसूं लागलें. तें पाहतांच बादशाहा सेन्याची स्तुति करून ह्मणाला—सेन्या, धन्य असो तुह्मी ! तुह्म्या संगतीच्या योगें मला श्रीकृष्णाचें दर्शन झालें. असें बोलून बादशाहाही हरिभजन करूं लागला. नंतर सेन्यानें धोकटी पाहिली, तींत होन मिळाले ते सर्व याचकांस वाटून टाकिले.

---

## गोष्ट ३५ वी.

### सात्विक राजा.

आंवळ्या जगन्नाथास एक सात्विक नांवाचा राजा भाविक भक्त होता. तो एके दिवशीं देवपूजा व भोजन

आटोपून महाद्वारीं येऊन, करमणुकीकरितां सोंगट्यांच डाव खेळत बसला असतां, पूजारी प्रसाद वांटीत पुढें आला व राजास देऊं लागला. तेव्हां राजानें डावा हात पुढें केला असें पुजाऱ्यानें पाहतांच त्यास प्रसाद न देतां तसाच निघून गेला. खेळ संपल्यावर राजा प्रसाद विचारूं लागला. तेव्हां इतर जन ह्मणाले, त्वां डावा हात पुढें केला ह्मणून तुला प्रसाद मिळाला नाहीं असें ऐकतां राजास पश्चात्ताप होऊन माझ्याकडून मोठा अपराध झाला असें मनांत समजून, याबद्दल कांहीं तरी प्रायश्चित्त घेतलें पाहिजे, असें मनांत आणून प्रधानास बोलावून ह्मणाला–प्रधानजी, मी रात्रौ निजतों तेथें एक पिशाच्च येत असतें. तें गवाक्ष द्वारांतून आंत हात घालील त्याचा हात आंत येतांच तूं शिक्षा कर. असें प्रधानानें ऐकून रात्रौ तो मंचकाजवळ जागत बसला. तोंच राजानें आपला डावा हात खिडकींतून आंत घातला. त्याबरोबर प्रधानानें तो हात तोडून टाकिला. नंतर प्रधान तो राजाचा हात असें ओळखून दुःखानें रडूं लागला. तेव्हां राजानें त्याची समजूत करून तो हात सेवकाबरोबर महाद्वारीं पाठविला व देवास सांगून पाठविलें कीं, हा तुझा अपराधी तुझ्या जवळ पाठविला आहे. त्यास मनास वाटेल ती शिक्षा करावी. यानें तुझें पूजन, अर्चन कधींही केलेलें नाहीं. असें ऐकतांच सर्वजनांस आश्चर्य वाटलें. भक्तजनांनीं

त्या हातावर बुका व पुष्पें यांचा वर्षाव केला. तोंच त्या हाताचा द्रवणा झाला. त्यामुळें त्यास बामेंत ठेविला. नंतर राजा महाद्वारीं येऊन हरिभजन करूं लागला. इतक्यांत पुजारी प्रसाद वांटीत आला तो हातावर घेतांच थोटा झालेला हात पूर्ववत् झाला. असा चमत्कार पाहतांच सर्वांस आश्चर्य वाटून जयजयकार केला.

## कर्माबाईचरित्र.

त्याच गावांत कर्माबाई नांवाची एक ब्राह्मणबाई रहात होती. तो गरोदर असतां तिचा पति मरण पावला. त्यामुळें ती फार दुःखी झाली. नंतर तिचे नवमास पूर्ण होतांच तिला एक मुलगा झाला तो मोठा होऊन लग्न वगैरे झाल्यावर त्याचीही बायको गरोदर असतां तो मरण पावला. तिलाही मुलगा झाला. त्या मुलाचें ( नातवाचें ) कर्माबाई चांगल्या प्रकारें संगोपन करीत असे. तो मुलगा कांहींसा मोठा झाल्यावर तोही मरण पावला. तेव्हां कर्माबाईस अतोनात दुःख झालें त्याचवेळीं त्या जगन्नाथ क्षेत्रांत साधुसंत तीर्थयात्रेकरितां आले होते. त्यांनीं कर्माबाईच्या येथेंच बिऱ्हाड केलें. तेव्हां संतांस पाहतांच ती दुःखानें आक्रोश करूं लागली असतां, साधुसंतांनीं काय झालें म्हणून प्रश्न केला. तेव्हां झालेलें सर्व वर्तमान कर्माबाईनें त्यांस सांगितलें. तें ऐकल्यावर साधुसंत तिला म्हणाले—बाई आतां झाली गोष्ट येत नाहीं.

उगाच शोक करून काय उपयोग ! तर आतां आह्मीं ही गोपाळकृष्णाची मूर्ति तुला देतों. तिजवर त्या मुलाप्रमाणेंच प्रीति ठेव ह्मणजे तुला जगन्नाथ प्रसन्न होईल. असें सांगून तिला श्रीकृष्णाची मूर्ति देऊन संत निघून गेले. नंतर ती कर्माबाई ज्या प्रमाणें नातवाचा प्रतिपाळ करीत होती, त्याच प्रमाणें त्या मूर्तीचा सांभाळ जिवापलीकडे करीत असे. एके दिवशीं तिनें दहींभात पुढें ठेवून खावयाची प्रार्थना केली, तोंच तिचा भक्तिभाव पाहून गोपाळ कृष्णाची मूर्ति जेवूं लागली. नंतर एकेवेळीं कित्येक अग्निहोत्री ब्राह्मण त्या कर्माबाईच्या घरीं आले. तों कर्माबाई प्रातःकाळींच गोपाळकृष्णास जेवूं घालीत आहे. असें पाहतांच ते कर्माबाईस ह्मणाले—बाई, तूं प्रातःकाळीं उठल्यावरस्नानादिक सडासंमार्जन करून, नंतर गोपाळकृष्णास भोजन घालित जा. त्या भोळ्याबाईनें त्यांचें ऐकून दुसरे दिवशीं गोपाळकृष्णास भोजन न देतां कामधंद्यास लागली. पण गोपाळमूर्तीस फार भूक लागली तिनें आपलें कृत्य आटोपून नंतर गोपाळमूर्तीस भोजन दिलें. तेव्हां जगन्नाथदेव पुजाऱ्याचे स्वप्नीं जाऊन ह्मणाले—आपण कर्माबाईस जाऊन सांगा कीं, तूं प्रथम ज्याप्रमाणें आपलें कृत्य चालवीत होतीस तसेंच चालीव. त्या अग्निहोत्र्यांनीं सांगितलेलें सोंवळें नको. तूं देवास लवकर भोजन

घालीत जा, असें स्वप्न पाहून पुजारी कर्माबाईस सर्व वर्तमान सांगूं लागले. त्याप्रमाणें दुसरे दिवशीं कर्माबाईनें प्रातःकाळींच जगन्नाथास भोजन अर्पण केलें. ते सर्वांदेखत मोठ्या संतोषानें जेवले. असें पाहतांच सर्वजनास मोठें नवल वाटलें व आनंदानें टाळ्यांचा गजर करून कर्माबाई-ची स्तुति करूं लागले. अद्यापिही कर्माबाईची खिचडी आल्याशिवाय देवाला नैवेद्य दाखवीत नाहींत असा परिपाठ आहे.

---

## गोष्ट ३६ वी.

### जनजसांवत व सूरदास मनमोहन.

जनजसांवत नांवाचा एक सावकार मोठा दयाळू, धार्मिक व ईश्वरभक्त होता त्याला चार पुत्र होते. तो सावकार जें दान वगैरे करीत असे तें त्या मुलांस आवडत नसे. त्यामुळे ते बापाचा द्वेष करीत असत. त्यांनीं त्याला ठार मारावा असा विचार करून राजाचे दरबारीं गेले आणि ह्मणाले—आमचा बाप विनाकारण द्रव्याचा खर्च करितो. तरी ती संपत्ति तुमचीच आहे असें समजून त्यास शिक्षा करावी. असें ऐकतांच राजानें त्या सावकारास बोलावून त्याची मोट बांधून विहिरींत लोटून दिला. परंतु त्याचें रक्षण करणाऱ्या श्रीरामचंद्रानें कांसवाचें रूप धरून त्या पाण्यांत प्रवेश केला व त्या आपल्या भक्तास पाठीवर

ठेविलें. तेव्हां जनज सावकार राजास ह्मणाला—माझा जर राम रक्षण करणारा आहे तरी कोणाचीही भीति मी बाळगीत नाहीं. असें ऐकतांच राजाला अनुताप होऊन, पाण्यांत उडी टाकून त्याला वर काढिलें आणि जनजाचे चरण धरून अपराधाची क्षमा मागूं लागला व त्याच्या पुत्रास शिक्षा केली. तेव्हांपासून राजा व त्याचे चौघे जण पुत्र रामभजन करूं लागले.

हस्तिनापुरांत अकबर बादशाहाचे पदरीं सूरदास मनमोहन ह्मणून एक वैष्णव होता. त्याला मथुरादेशाचा अधिकार दिला होता, त्याचा नेम असा होता कीं, सर्वांस अन्नवस्त्र देऊन तृप्त करावें. असें कित्येक दिवस चाललें; तों जवळचें द्रव्य संपून गलें. तेव्हां तो चिंताक्रांत होऊन ह्मणाला—आतां माझे जवळ बादशाहाचें खंडणीचें द्रव्य आहे पण तें खर्च केलें असतां मला शिक्षा मिळेल. असें जरी त्याच्या मनांत आलें तरी "संतकारणींच खर्च होईल." असा निश्चय करून. द्रव्यभांडार फोडून वैष्णवांस वस्त्रें भूषणें वगैरे देऊन लोककल्याणार्थ सर्व द्रव्य संपविलें. तेव्हां त्याच्या दुष्ट दिवाणानें विनाकारण द्रव्य खर्च केलें अशी बातमी बादशाहास कळविली. बादशाहानें सेवकाबरोबर सूरदासास बोलावणें पाठविलें. त्या वेळीं सूरदासानें एका पेटींत कांहीं धोंडे भरून, तींत एक पत्र लिहून घातलें कीं, "हे महाराज, मी सर्व द्रव्य सत्पात्रीं

दान केलें व अर्धरात्रीं अरण्यांत पळून गेलों " अशा अर्था-
चें पत्र पेटींत घालून ती पेटी सेवकाजवळ देऊन, त्यास म्ह-
णाला—ही पेटी बादशाहास नेऊन द्या व हींत अमूल्य जवा-
हीर तुमच्या करितां घेतलेलें आहे असें सांगा. नंतर रात्रौ
भोजन वगैरे होऊन झोंपीं गेल्यावर, सूरदास अर्धरात्रीं रा-
जाच्या भीतीनें अरण्यांत पळून गेला व भजन करूं लागला.
प्रातःकाळीं सेवक पाहतात तों सूरदास नाहीं म्हणून आस-
पास शोध केला, तरी पत्ता नाहीं. नंतर ती पेटी घेऊन रा-
जापुढें आणून ठेविली व निरोप कळविला. राजानें ती पेटी
उघडून पाहिली तों आंतून धोंडे निघाले असें पाहतांच सेवक
थर थर कांपूं लागले. तोंच एक पत्र पेटींत मिळालें तें बिरबल
वाचूं लागला. त्यांत असा मजकूर होता कीं " मी सर्व द्रव्य
साधुसंतांस सत्पात्रीं दान दिलें व तुमच्या भीतीनें अरण्यांत
पळून गेलों" असा मजकूर ऐकतांच बादशाहानें त्या दुष्ट बुद्धी
दिवाणाला, " विनाकारण खर्च केला " असें सांगितल्या-
बद्दल शिक्षा दिली. नंतर त्याच्या शोधाकरितां देशोदेशीं
पत्रें लिहिलीं. ती बातमी सूरदासाचे कानीं गेली. तेव्हां तो
बादशाहास जाऊन भेटला. बादशाहानें त्यास आलिंगन
देऊन त्याची स्तुति करून मथुरा नगरीचा अधिकार देऊन
पहिल्याप्रमाणें साधुसंतांस तृप्त करण्याची आज्ञा दिली.
त्याप्रमाणें तो प्रथमचा क्रम चालवूं लागला व पांडुरंगाच्या

गुणाचें कवित्व करूं लागला. त्याचें कवित्व अभंग पदें या रूपानें प्रसिद्ध आहे.

एके दिवशीं सूरदास श्रीकृष्णदर्शनास महाद्वारीं येऊन उभा असतां, एक बैरागी ह्मणाला—मी देवदर्शन करून येतों, तों पर्यंत माझ्या वाहणा आपणाजवळ ठेव. नंतर त्या वाहणा घेऊन सूरदास तेथेंच भजन करीत बसला. बैरागी देवळांत जाऊन कीर्तन करीत बसला. बऱ्याच वेळानें कीर्तन आटोपून बाहेर यऊन पाहतो तों सूरदास वाहणा उराशीं धरून बसला आहे. तेव्हां बैराग्यास संतोष वाटून त्याच्या मस्तकीं वरद हस्त ठेविला व तूं खरा संतसेवक आहेस असें ह्मणाला.नंतर त्याचीसेवा पाहून श्रीकृष्णानें त्यास दर्शन दिलें.

---

## गोष्ट ३७ वी.

### रसिक मुरार.

मथुरानगरींत रसिकमुरार ह्मणून एक वैष्णव भक्त होता. तो यमुनेचें स्नान करून कृष्णदर्शन घेऊन संतांस भोजन घालीत असे. एके दिवशीं वैष्णव त्याचे घरीं आले. तेव्हां त्यानें शिष्यास आज्ञा केली कीं यांची पूजा करून त्यांचें चरणतीर्थ घेऊन ये. शिष्यानें सर्वांची पूजा केली व चरणतीर्थ घेतलें त्यांत एक पायांस रक्तपिती फुटलेला ब्राह्मण होता; त्याचें चरणतीर्थ न घेतां तसेंच गुरुजीस

आणून दिलें. तें त्यानें प्राशन करतांच ह्मणाला—आज तीर्थास रुचि कां बरें नाहीं ? तेव्हां शिष्य ह्मणाला—एक घाणेरडा ब्राह्मण होता. त्याचें चरणतीर्थ मात्र मी घेतलें नाहीं; असें ऐकून रसिक त्या ब्राह्मणाजवळ जाऊन आपल्या हातानें त्याचे चरण धुवून तें तीर्थ प्याला. तेव्हां त्या तीर्थाची गोडी लागून समाधान पावला. त्यावेळीं सर्व संतानीं आश्चर्य मानून त्याच्या मस्तकावर वरद् हस्त ठेविला. त्या दिवसापासून त्याला रसिकमुरार असें नांव पडलें एका राजानें त्याची भक्ति पाहून त्याला चार गांव इनाम दिले. त्या गांवाचा वसूल एका दुष्टानें राजाला पैसे भरून आपणाकडे घेतला आणि रसिकाचे गांवीं येऊन इनाम गांव जप्त केले. तेव्हां लोकांनीं त्याची पुष्कळ समजूत घातली पण तो ऐकेना. शेवटीं रसिकानें गुरुजींस बोलावून आणून, त्यांस सर्व वृत्तांत कथन केला. गुरुजी ह्मणाले—तूं त्याचे जवळ जाऊन आपले गांव सोडवून घे. असें ऐकतांच रसिक शिष्यांसह भजन करीत त्या दुष्टाकडे चालला. रसिक येत आहे असें पाहतांच त्या दुष्टानें त्या सर्वांस हत्तीच्या पायांखालीं मारण्याचा विचार करून, त्यांच्या आंगावर खवळलेल्या हत्तीस सोडलें. हत्ती रसिकास पाहून त्याच्या चरणावर दंडवत घालूं लागला. असें पाहून सर्व जनांस मोठें नवल वाटलें. नंतर त्या हत्तीला रामकृष्ण हा मंत्र देऊन त्याच्या गळ्यांत तुळशीची

माळा घातली. त्या दुष्टाला ही बातमी सेवकांनीं कळविली. तेंच त्याच्या मनांला अनुताप होऊन, रसिकास साष्टांग नमस्कार घातला व ह्मणाला—महाराज, आपली काय इच्छा आहे? तेव्हां रसिकानें आपले गांव व हत्ती मागून घेतला आणि गुरूजवळ आला. त्या हत्तीस ज्ञान होऊन, तो दररोज संध्याकाळीं हरिकीर्त्तन ऐकत बसे व दिवसा अरण्यांत जाऊन, पत्रावळी करितां पानें व जळाऊ लांकडे घेऊन येत असे. साधुसंतांचें भोजन आटोपल्यावर उच्छिष्ट पात्रें तो प्रीतीनें भक्षण करीत असे. पुढें रसिक, हत्ती व शिष्यांसह तीर्थयात्रेस निघाला. ते अरुणावतीस येऊन उतरले. तेथील राजा दुष्ट होता. त्याला सेवकांनीं सांगितलें कीं, आपल्या गांवांत गोसाव्यांनीं एक हत्ती आणिला आहे. तो आपणांस उपयोगी पडेल. तर तो त्याच्या पासून मागून घ्यावा. असें सेवकांचें भाषण ऐकतांच राजानें तो हत्ती आणावयाची आज्ञा दिली. सेवक हत्ती मागावयास येतांच, त्या रसिकानें त्या असें सांगितलें. त्याला धरावयास सेवक गेले, त्यांस तो मारूं लागला. तो वृत्तांत त्यांनीं राजास कळविला, तेव्हां राजानें अशी युक्ति काढिली कीं, एका महातास तुळशीमाळा, टिळे लावून रामराम ह्मणत पाठवावा व येथें घेऊन यावा, त्या प्रमाणें युक्ति करतांच तो हत्ती निमूटपणें आला. तेव्हां राजाचें कपट हत्तीला कळलें. त्या दिवसापासून त्यानें अन्नचारा बंद करून

सातवे दिवशीं तो मरण पावला. पहा ! यत्किंचित पशूलाही संतसंगानें ज्ञान प्राप्त झालें; मग मनुष्यमात्रास कां बरें होऊं नये !

---

## गोष्ट ३८ वी.

### मिराबाई.

उदेपुरांत एक राजा विष्णुभक्त रहात असे. तो दररोज देवाची पूजा करून नंतर भोजन करीत असे. त्याला एकुलती एक कन्या होती. ती बापाबरोर देवळांत जात असे. तिचें मिराबाई असें नांव ठेविलें होतें. तिनें श्यामसुंदर भगवंताची मूर्ति पाहून मनाचा निश्चय केला कीं, मी देवाशिवाय दुसरा नवरा करणार नाहीं. मुलगी मोठी झाल्यावर एके दिवशीं राजा ह्मणाला—मुली, आतां तुला योग्य वर पाहिला पाहिजे. असें ऐकतांच मुलगी ह्मणाली—बाबा, मी माझ्या योग्य वर पाहून ठेविला आहे ! बाप ह्मणाला—तो कोठें आहे ? मुलगी बोलली—तुह्मीं ज्याची दररोज पूजा करितां तोच श्रीकृष्ण होय. बापानें सांगितलें—मुली, हा बौद्धरूपी भगवान् तुझा पति कसा होईल याकरितां एखाद्या नामांकित राजाला वर. मुलगी बोलली त्याच्याशिवाय इतर सर्व मला तुमच्या प्रमाणें आहेत हें कन्येचें भाषण ऐकतांच राजास आश्चर्य वाटून, ती गोपालमूर्ति तिच्या जवळ देऊन तिला आपल्या मंदिरांत नेण्यास आज्ञा दिली. नंतर ती दररोज त्या मूर्तीचें पूजन क-

रून, विष्णुभक्तांस भोजन देऊन, उरलेला प्रसाद भक्षण करीत असे. अशा तिच्या क्रमामुळें गांवांतील कुटिल लोक निंदा करूं लागले. ती बातमी राजास कळतांच, राजानें मुलीची समजूत करण्याकरितां बायकोस पाठविली. तिनें मुलीला पुष्कळ उपदेश केला; परंतु तिचें वचन ढळलें नाहीं. नंतर राणीनें तें वृत्त राजास कळविलें. तेव्हां राजानें विष घालून तिला ठार मारण्याचा निश्चय करून, राणीच्या हातीं विषाचा प्याला पाठविला. मातेनें रुदन करीत तो प्याला मिराबाईजवळ आणिला आणि पिण्यास सांगितलें. मिराबाईनें तो प्याला हातांत घेऊन देवास साष्टांग नमस्कार घालून, धांवा केला व विषाचा प्याला देवाला नैवेद्य दाखवून प्राशन केला. तों तें विष तिला अमृतासमान लागलें. पण पांडुरंगाचा रंग हिरवा झाला. राजाला राणीचा विश्वास वाटेना म्हणून तोही मिराबाई जवळ आला व पाहतो तों देव हिरवा झाला आहे असें दिसलें. तेव्हां राजाला अनुताप होऊन कन्येचे चरण धरता झाला. तोंच कन्येनें त्यास वर उचलून धरिला व म्हणाली—तुमच्या योगें मला पांडुरंगाचे चरण जोडले. नंतर राजानें मिराबाईस सांगितलें कीं, मूर्तीचा रंग पालटला आहे. तो पुन्हा जशाचा तसा कर. तेव्हां मिराबाईनें पांडुरंगास प्रार्थून पहिल्याप्रमाणें रंग केला. परंतु कांहींतरी खूण राहावी म्हणून गळ्याचा तेवढा मात्र रंग हिरवा ठेविला.

# गोष्ट ३९ वी.

## कान्होपात्रा

मंगळवेढ्यांत श्यामा कलावंतिणीच्या पोटीं कान्होपात्रा ह्मणून एक कन्यारत्न झालें होतें. तिचें स्वरूप देवांगनांपेक्षांही सुरेख होतें. ती कान्होपात्रा गायनकलेमध्यें रंभा तिलोत्तमा यांसही लज्जायमान करीत असे. एके दिवशीं तिची आई श्यामा ह्मणाली–मुली आपण राजाकडे गायन करावयास जाऊं चल. ह्मणजे तो तुझें लावण्य पाहून आपणास वस्त्रालंकार देईल. तेव्हां कान्होपात्रा ह्मणाली–माझ्या योग्य पुरुष मला कोठेंच दिसत नाहीं. माझ्यापेक्षां कोटिगुण लावण्यानें असेल, तरच नृत्य गायन करीन. असें ऐकतांच माता स्तब्ध झाली. पुढें कांहीं दिवसांनीं पंढरीस निघालेली यात्रा तिनें पाहतांच, ती संतांस ह्मणाली–महाराज, तुह्मी कोठें जातां ? ते ह्मणाले–पंढरपूर क्षेत्रांत विष्णु पुंडलिकाकरितां आला आहे. त्याच्या दर्शनास जात आहों. असें भाषण ऐकतांच आपणही जावें. असा निश्चय करून, मातेची आज्ञा घेऊन ती पंढरीस आली व त्या ठिकाणीं येऊन विठ्ठलनामाचें गायन करीत पंढरींतच राहिली. तों दुष्टानें बेदरास जाऊन बादशाहास सांगितलें कीं, पंढरपुरांत एक सुंदर गणिका आलेली आहे, तर तिला

आपण येथें बोलावून पहावी. ह्मणजे तिच्या सुंदरपणाबद्दल खात्री होईल. असें ऐकतांच बादशाहानें तिला आणावयाची आज्ञा दिली. सेवक पंढरपुरीं येऊन तिला बादशाहाचा निरोप सांगूं लागले. तेव्हां ती ह्मणाली—मी देवाचें दर्शन करून येतें. असें सांगून देवळांत जाऊन देवाचा धांवा करूं लागली. तिची ती करुणावाणी देवांनीं ऐकून तिला आपल्या स्वरूपांत मिळवून घेतलें. तिचें तें प्रेत दक्षिण-द्वारीं नेऊन पुरलें. त्या ठिकाणीं एक तरटाचा मोठा वृक्ष-झाला. इकडे बादशाहाचे सेवक पुजाऱ्यांस विचारूं लागले कीं, कान्होपात्रा कोठें आहे ? पुजारी ह्मणाले—कान्होपात्रेला पांडुरंगानें आपल्या स्वरूपांत मिळवून घेतलें. सेवकांनीं विचारलें तिचें प्रेत कोठें आहे ? तेव्हां पुजाऱ्यांनीं तें तरटाचें झाड दाखवून ह्मणाले—तिच्या प्रेताचें हें झाड झालें आहे. असें ऐकतांच त्या सेवकांस संशय येऊन पुजाऱ्यांस बादशाहाकडे घेऊन गेले व झालेलें वर्तमान त्यास सांगितलें. बादशाहाला पुजाऱ्यांनीं नारळ व बुक्याचा प्रसाद नेऊन दिला. त्यांत एक केंस निघाला. तेव्हां बादशाहाला क्रोध येऊन हा केंश प्रसादांत कोठून आला ह्मणून प्रश्न केला. पुजारी ह्मणाले—तो देवाचा केंश आहे. नंतर देवाला केंस आहेत कीं, काय ? याची प्रचीत पाहण्याकरितां बादशाहा पंढरपुरांत आला.

तों पुजाऱ्यांनीं देवाचा धांवा करून तुझ्या डोईला केंस आहेत असें बादशाहाचे दृष्टीस पडावें ह्मणून प्रार्थना केली. बादशाहा देवळांत येऊन पाहूं लागला. तों देवाचे कुरळ केंस बादशाहाचे दृष्टीस पडले. तेव्हां त्याला अनुताप होऊन पांडुरंगास साष्टांग नमस्कार घातला व केलेल्या अपराधाची क्षमा मागून आपल्या गांवीं आला. तें तरटीचें झाड अद्यापि पंढरपुरास दृष्टीस पडतें.

---

## गोष्ट ४० वी.

### दामाजीपंत.

मंगळवेढें हा गांव बेदर बादशाहाचा असून, तो त्यानें आपला विश्वासू नोकर दामाजीपंत याच्या हवालीं केला होता. दामाजी हा विष्णुभक्त असून धार्मिक होता त्याचा साधुसंतांस अन्नवस्त्र देऊन संतुष्ट करण्याचा नेम असे. एकेकाळीं मोठा दुष्काळ पडला, त्यावेळीं पंढरपुरचे ब्राह्मण उपाशीं मरूं लागले. तेव्हां एक ब्राह्मण मंगळवेढ्यास येऊन, दामाजीपंतास ह्मणाला—मी अन्नावांचून तळमळत आहें तरी मला अन्नोदक देऊन तृप्त करावें. असें त्याचें भाषण ऐकून त्याचा सन्मान करून त्यास यथेच्छ भोजन दिलें. नंतर तो ह्मणाला—माझी बायको व मुलें उपाशीं मरत आहेत त्यांस

कांहीं धान्य द्यावें. असें ऐकून दामाजीनें त्यास दोन खंडी धान्य देऊन रवाना केलें. तो पंढरपुरास येतांच सर्व लोक त्याचें धान्य हिसकावून घेऊं लागले. तेव्हां तो ब्राह्मण ह्मणाला—तुह्मीं मंगळवेढ्यास दामाजीकडे जा ह्मणजे तो तुह्मांला धान्य देईल. असें त्याचें वचन ऐकून सर्व ब्राह्मण दामाजीच्या घरीं गेले. त्यांस दामाजीनें धान्यकोठारें फोडून देऊन पाहिजे तितकें नेण्यास सांगितलें. ती बातमी सर्व पंढरपुरांत पसरतांच सर्व जाती येऊन त्यांनींही धान्य नेलें. हें पाहतांच तेथें एक मुजुमदार दुष्ट ब्राह्मण होता, त्यानें बेदरास बादशाहाला कळवितांच, तो क्रोधायमान होऊन दामाजीस आणण्याकरितां दूत पाठविता जाहला. त्या दूतानें दामाजीस बादशाहाचा निरोप कळवितांच, दामाजी ह्मणाला—आपल्याकडून जर अपराध झाला आहे तर गेलें पाहिजे. मग बायकोचा विचार घेऊन, दूतास ह्मणाला—आपण पंढरपुराकडून जाऊं चला. असें बोलून दामाजी देवळांत येऊन देवाचा धांवा करून ह्मणाला—देवा, आतां तुझी माझी हीच शेवटची भेट ! असें बोलून नमस्कार करून निघाला, दामाजी गेल्यावर देव रुक्मिणीस ह्मणाले—दामाजी आपल्यावर सर्व भार ठेवून गेला आहे त्याचें संकट जाणलें पाहिजे. तरी आतां मी माहाराचा वेष घेऊन जातों आणि दामाजीपैकीं धान्याचे रुपये भरून पावती आणून

दामाजीच्या पोथींत ठेवितों. असें सांगून देवांनीं माहाराचा वेष घेतला व रुपयांची थैली डोकीवर घेऊन बेदरास येऊन, बादशाहास जोहार करून ह्मणाला—मायबाप, दामाजीपंतानें तुमचे रुपये पाठवून दिले आहेत व पावती मागितली आहे. असें सांगून रुपयांची थैली त्याच्या पदरांत घातली. ते रुपये मोजतां मोजतां सेवक दमले तरी ते रुपये सरले नाहींत असें पाहतांच सर्व जनांस मोठें आश्चर्य वाटलें. नंतर बादशाहा पासून पावती लिहून घेऊन जोहार करून देव निघून गेले. दामाजी, बेदरास येऊन पोंचतांच, बादशाहा त्यास ह्मणाला—दामाजी, आतां कां आलास, मघांच तुझा विठु ह्मार धान्याचे रुपये भरून पावती घेऊन गेला. असें ऐकतांच दामाजी ह्मणाला—महाराज तुमचें भाग्य थोर ह्मणून तुह्मांस पांडुरंगाचें दर्शन झालें. तो जर मनुष्य असता, तर इतक्या रुपयांचा बोजा कसा आणता! असें त्याचें भाषण ऐकतांच सर्वांस अनुताप होऊन ह्मणाले—दामाजी; तुझ्या कृपेनें आह्मांस पांडुरंग भेटला. नंतर दामाजी बादशाहास ह्मणाला—आतां, तुमची नोकरी मला पुरे. कारण माझ्याकरितां देवांनीं नीच वेष घेतला. तर मला पंढरीस जाण्याची आज्ञा द्यावी. मग तेथून दामाजी मंगळवेढ्यास येऊन कुटुंब घेऊन पंढरींत येऊन हरिकीर्तन करीत राहिला.

---

# गोष्ट ४१ वी.

## शांत ब्राह्मणी बादशाहा.

बेद्राच्या गादीवर शांत ब्राह्मणी नांवाचा एक बादशाहा राजा राज्य करीत होता. तो विलासी असून रात्रंदिवस स्त्रीसहवर्तमान विलासक्रीडा करीत असे. एके दिवशीं उभयतांनीं केळीं खाऊन त्यांच्या साली रस्त्यावर फेंकून दिल्या. त्या एक भिकारी उचलून खात असतां बेगमनें पाहिलें. तेव्हां तिनें तें बादशाहास दाखविलें. तें पाहतांच बादशाहास कोप येऊन चाकरास ह्मणाला—अरे ? हा भिकारी येथें कसा आला ? असें बोलून त्या भिकाऱ्याला व चाकराला मार दिला. तेव्हां भिकारी आनंदानें हंसूं लागला. त्यास बादशाहा ह्मणाला—अरे ? तुला मी इतका मारला तरी तूं रडण्याचें सोडून हंसतोस याचें कारण काय ? भिकारी ह्मणाला—अहो ! मी तर पडलेल्या साली खाल्ल्या, ह्मणून मला इतका मार मिळाला; तर ज्यानें आंतील मगज खाल्ला असेल, त्यास काय शिक्षा मिळेल बरें ? तसेंच मी या तुमच्या मंदिराच्या जवळ आलों ह्मणून मला असें दुःख भोगावें लागलें आणि तुह्मीं रात्रंदिवस येथें राहतां तर तुह्मांस किती कष्ट सोसावे लागत असतील ? याचा मला अजमास मिळेना. ह्मणून मी हंसत होतों. असें त्या भिकाऱ्याचें भाषण ऐकतांच बादशाहाचें

मन विरक्त झालें व कृतकर्माचा त्याला पश्चात्ताप होऊन राज्यभार टाकून अरण्यांत जाऊन कोणत्या उपायानें परमेश्वरप्राप्ति होईल अशा विचारांत पडला. तों त्या रस्त्यानें आषाढीची यात्रा पंढरपुरास चालली होती त्या यात्रे बरोबर शांतब्राह्मणीही पंढरपुरास महाद्वारीं जाऊन त्यानें पांडुरंगाचें दर्शन घेतलें व आपला उद्धार होण्याकरितां अनन्यभावें पांडुरंगाचा धांवा करूं लागला. अशाप्रकारें तीन दिवस माहाद्वारीं अन्नपाणी वर्ज्य करून ध्यानस्थ बसला असतां भक्तरक्षक पांडुरंगानें त्याला दृष्टांत दिला कीं, " कल्याण मुक्कामीं सहजानंद नांवाचा स्वामी आहे, त्याचा उपदेश घे. ह्मणजे तो तुला जन्ममरणापासून मुक्त करील. " असा दृष्टांत पाहून शांतब्राह्मणी कल्याणास आला; परंतु त्या ठिकाणीं स्वामी नाहीं. ह्मणून तेथून परतून पुनः पंढरीस आला, त्या ठिकाणीं स्वामींची व शांतब्राह्मणीची भेट झाली. नंतर त्यांनीं त्यास मंत्रोपदेश देऊन त्याचें मृत्युंजय असें नांव ठेविलें. पुढें तो नारायणपुरीस राहून दृढभावानें ईशस्मरण करीत असतां, भवराय नांवाचा एक जंगम त्याचा शिष्य झाला. हें वर्तमान समुच्चय नांवाच्या एका जंगमास कळतांच त्यानें भवराय यास जातींतून वाळीत टाकिलें व मृत्युंजय गु-

रूची निंदा करूं लागला; परंतु तिकडे त्यानें लक्ष्य दिलें नाहीं.

पुढें एके दिवशीं काशीपति राजानें आपले येथें दहा जंगम भोजनास बोलाविले. ते जंगम जेवावयाचे वेळीं आपापल्या शिवलिंगास नैवेद्य दाखविण्याकरितां बाहेर काढूं लागले. तों एकाजवळही शिवलिंग नाहीं. तेव्हां लिंगें काय झालीं ह्मणून ते सर्व विचारांत पडले. तोंच हा प्रकार काशीपति राजाला कळतांच तो ह्मणाला–जंगमहो, तुमच्या पैकीं कोणाच्या तरी हातून एखाद्या साधूचा छल झाला असावा, ह्मणून हा शंकराचा कोप तुमच्यावर झाला असावा. असें ऐकतांच समुच्चय जंगमाला मृत्युंजयाची निंदा केल्याबद्दलची आठवण झाली. तेव्हां त्यानें राजाला सर्व हकीगत सांगितली. ती ऐकून राजा ह्मणाला– त्या मृत्युंजयास शरण जा ह्मणजे तुमचीं लिंगें तुह्मांस मिळतील. त्या प्रमाणें ते सर्व जंगम मृत्युंजयाला शरण गेले व क्षमा मागून लिंगांचें वर्तमान सांगूं लागले. तेव्हां मृत्युंजयाला दया येऊन आपल्या वेदांत व सिद्धांत नांवाच्या दोन कुत्र्यांस जवळ बोलावून, त्यांच्या समक्ष सर्वांचीं लिंगें त्या कुत्र्यांच्या मुखांतून ओकविलीं व आपापलीं लिंगें घ्यावयास सांगितलीं. हा अद्भुत चमत्कार पाहून नारायणपुरींतील सर्व लोकांस मोठें आश्चर्य वाटलें व ते सर्व जंगम मृत्युंजयाच्या भजनीं लागले.

---

# गोष्ट ४२ वी.

## भानुदासचरित्र.

पैठणामध्यें सूर्याची उपासना करणारा एक ब्राह्मण होता. त्याला एक मुलगा झाला. त्याचें नांव भानुदास असें होतें. तो मोठा झाल्यावर त्याचा व्रतबंध करून, त्यास अध्ययन शिकवूं लागला. एके दिवशीं मुलास शिकवीत असतां, त्याचेवर बाप क्रोधायमान झाला. तव्हां तो मुलगा बापाच्या भीतीनें लांब पळून गेला. तों त्यास भूमींत गुप्तजागीं एक सूर्याचें देऊळ आढळलें. त्या देवळांत जाऊन देवाला नमस्कार करून ध्यान करूं लागला. तो त्याची बाळभक्ति पाहून प्रत्यक्ष देव मनुष्यरूपानें प्रगट होऊन त्यास अभय वर देऊन ह्मणाले—" तूं निरंतर पांडुरंगाचें नामस्मरण करीत जा. ह्मणजे तुला मी पावेन. " असें सांगून नारायण अदृश्य झाले. इकडे त्याचीं आईबापें शोध करूं लागलीं; परंतु कोठेंही थांग लागला नाहीं. एके दिवशीं तो मुलगा त्या देवळांतून बाहेर आला असतां एका ब्राह्मणाच्या दृष्टीस पडला. तेव्हां तो ब्राह्मण त्या मुलास हांका मारूं लागला. तोंच तो मुलगा त्या देवळांत पळून गेला, नंतर तो ब्राह्मण घरीं येऊन त्याच्या आईबापांस सांगूं लागला. तें ऐकून भानुदासाचा बाप कांहीं लोक बरोबर घेऊन त्या देवळांत आला व ते पाहतात तों

रूची निंदा करूं लागला; परंतु तिकडे त्यानें लक्ष्य दिलें नाहीं.

पुढें एके दिवशीं काशीपति राजानें आपले येथें दहा जंगम भोजनास बोलाविले. ते जंगम जेवावयाचे वेळीं आपापल्या शिवलिंगास नैवेद्य दाखविण्याकरितां बाहेर काढूं लागले. तों एकाजवळही शिवलिंग नाहीं. तेव्हां लिंगें काय झालीं ह्मणून ते सर्व विचारांत पडले. तोंच हा प्रकार काशीपति राजाला कळतांच तो ह्मणाला–जंगमहो, तुमच्या पैकीं कोणाच्या तरी हातून एखाद्या साधूचा छल झाला असावा, ह्मणून हा शंकराचा कोप तुमच्यावर झाला असावा. असें ऐकतांच समुच्चय जंगमाला मृत्युंजयाची निंदा केल्याबद्दलची आठवण झाली. तेव्हां त्यानें राजाला सर्व हकीगत सांगितली. ती ऐकून राजा ह्मणाला– त्या मृत्युंजयास शरण जा ह्मणजे तुमचीं लिंगें तुह्मांस मिळतील. त्या प्रमाणें ते सर्व जंगम मृत्युंजयाला शरण गेले व क्षमा मागुन लिंगांचें वर्तमान सांगूं लागले. तेव्हां मृत्युंजयाला दया येऊन आपल्या वेदांत व सिद्धांत नांवाच्या दोन कुत्र्यांस जवळ बोलावून, त्यांच्या समक्ष सर्वांचीं लिंगें त्या कुत्र्यांच्या मुखांतून ओकविलीं व आपापलीं लिंगें घ्यावयास सांगितलीं. हा अद्भुत चमत्कार पाहून नारायणपुरींतील सर्व लोकांस मोठें आश्चर्य वाटलें व ते सर्व जंगम मृत्युंजयाच्या भजनीं लागले.

---

# गोष्ट ४२ वी.

## भानुदासचरित्र.

पैठणामध्यें सूर्याची उपासना करणारा एक ब्राह्मण होता. त्याला एक मुलगा झाला. त्याचें नांव भानुदास असें होतें. तो मोठा झाल्यावर त्याचा व्रतबंध करून, त्यास अध्ययन शिकवूं लागला. एके दिवशीं मुलास शिकवीत असतां, त्याचेवर बाप क्रोधायमान झाला. तव्हां तो मुलगा बापाच्या भीतीनें लांब पळून गेला. तों त्यास भूमींत गुप्तजागीं एक सूर्याचें देऊळ आढळलें. त्या देवळांत जाऊन देवाला नमस्कार करून ध्यान करूं लागला. ती त्याची बाळभक्ति पाहून प्रत्यक्ष देव मनुष्यरूपानें प्रगट होऊन त्यास अभय वर देऊन ह्मणाले—“ तूं निरंतर पांडुरंगाचें नामस्मरण करीत जा. ह्मणजे तुला मी पावेन. ” असें सांगून नारायण अदृश्य झाले. इकडे त्याचीं आईबापें शोध करूं लागलीं; परंतु कोठेंही थांग लागला नाहीं. एके दिवशीं तो मुलगा त्या देवळांतून बाहेर आला असतां एका ब्राह्मणाच्या दृष्टीस पडला. तेव्हां तो ब्राह्मण त्या मुलास हांका मारूं लागला. तोंच तो मुलगा त्या देवळांत पळून गेला, नंतर तो ब्राह्मण घरीं येऊन त्याच्या आईबापांस सांगूं लागला. तें ऐकून भानुदासाचा बाप कांहीं लोक बरोबर घेऊन त्या देवळांत आला व ते पाहतात तों

भानुदास देवाचे चरणावर मस्तक ठेवून निजला आहे. बाप त्याला जागा करून पोटाशीं धरून ह्मणाला–बाळा, तूं येथें इतके दिवस कसा वांचलास ? असें ऐकतांच भानुदासानें सर्व हकीगत बापास कळविली. ती ऐकतांच बरोबर आलेल्या सर्व जनांस मोठें नवल वाटलें. नंतर भानुदासास घरीं आणून त्याचें लग्न केलें. तो नेहमीं श्रीहरीचें भजन करीत असे. त्याचे घरची अन्नवस्त्राची स्थिति चौघां गृहस्थानीं पाहून, त्याला शंभर रुपयांचा कापडाचा माल देऊन व्यापार करावयास सांगितला व ह्मणाले–आपण व्यापारांत कधींही खरें बोलूं नये. असें ऐकतांच भानुदास त्यांस ह्मणाला–तुह्मीं मला कांहीं जर सांगितलें तरी मी खोटें कधींही बोलणार नाहीं. असें दुकान मांडलें. तेव्हां गिराईकें येऊं लागलीं, त्यांस भानुदास एकच किंमत सांगून हरिनाम घेत असे. त्याची ती सांगितलेली किंमत गिराईकास खरी वाटून, ते भानुदासाच्याच दुकानचा माल घेत असत.

एके दिवशीं सर्व व्यापारी बाजारास गेले असतां, त्यांच्याबरोबर भानुदासही गेला. त्या ठिकाणीं हरिदास बुवाचें कीर्तन चाललें होतें. तें ऐकण्याकरितां भानुदास निघाला. तेव्हां बरोबरच्या सोबत्यांस ह्मणाला–मी कीर्तनास जातों, तर माझें बिऱ्हाड सांभाळावें. असें ऐकतांच ते व्यापारी ह्मणाले–आह्मीं तुझें बिऱ्हाड सांभाळणार नाहीं. पाहिजे.

तर बरोबर घेऊन जा. हें त्या दुष्टांचें भाषण ऐकतांच तो बि-ऱ्हाड तेथेंच टाकून कीर्तनास गेला. इकडे त्या दुष्ट व्यापाऱ्यांनीं त्याचा घोडा सोडून देऊन कापडाचीं दिंडें लावून ठेविलीं. असें पाहतांच पांडुरंग ब्राह्मणाचा वेष धरून भानुदासाचा घोडा धरून बसले. रात्रौ त्या सर्व व्यापाऱ्यांच्या दिंडया चोरांनीं लुटून नेल्या व त्यांस चांगला मार दिला. भानुदास कीर्तन संपतांच घरीं आला तों मार्गांत एक ब्राह्मण आपला घोडा धरून बसला आहे; असें त्यास दिसलें. पुढें येऊन पाहतो तों वेषधारी विठोबा घोडा तेथेंच ठेवून गुप्त झाला. नंतर भानुदास घोडा घेऊन बिऱ्हाडास आला व पाहतो तों सर्व व्यापारी रडत बसले आहेत. तेव्हां भानुदासानें काय झालें ह्मणून प्रश्न केला. तेव्हां त्या सर्व व्यापाऱ्यांनीं झालेलें वर्तमान त्यास कथन केलें. तें ऐकतांच भानुदासाचें अंतर द्रवून ह्मणाला—पांडुरंगानें माझ्यासाठीं ब्राह्मणाचा वेष घेऊन घोडा संभाळला. तर हा मला व्यापारच नको. असें बोलून आपला घोडा व कापडाचीं दिंडें व्यापाऱ्यांस वांटून टाकून घरीं येऊन हरिनाम घेत स्वस्थ बसला. नंतर आषाढमासीं पंढरीचे यात्रेस येऊन तो कीर्तन करीत असतां पांडुरंग प्रेमानें ऐकण्यास आला. असें पाहतांच सर्व लोक आश्चर्य करूं लागले. तेव्हांपासून भानुदासाचे कीर्तनास पुष्कळ लोक येऊं लागले.

---

# गोष्ट ४३ वी.

## रामराजाचें चरित्र.

पंढरीक्षेत्रांत एक अति दरिद्री ब्राह्मण राहात असे. तो द्रव्याच्या आशेनें अविद्या नगरीमध्यें रामराजाकडे गेला त्या ब्राह्मणास राजानें नमस्कार करून बसावयास आसन दिलें व त्याची पूजा केली. व तो ह्मणाला—महाराज, आपण कोठचे राहणारे व इकडे येणें कां झालें ? ब्राह्मण ह्मणाला— मी पंढरपुरचा राहणारा ब्राह्मण असून आपलें औदार्य ऐकून या ठिकाणीं आलों आहें. असें ऐकतांच राजा आनंदित होऊन ह्मणाला—मी स्नान करून देवीच्या पूजेस जातों तरी आपणही देवळाची शोभा पाहण्यास चालावें. असें बोलून दोघेही देवीच्या देवळांत आले. तेथील देखावा पाहण्यासारखा होता. नंतर राजा पूजा करून प्रसाद वांटून त्या ब्राह्मणास ह्मणाला—या देवीसारखें दैवत या त्रिभूवनांतही मिळणार नाहीं. तुमच्या पंढरींत देखील असें माहात्म्य नसेल. असें ऐकतांच ब्राह्मण राजास ह्मणाला—तुह्मीं अजून पंढरी पाहिली नाहीं, ह्मणून आपल्याच दैवतास थोर ह्मणतां ? देवळास सोन्याचें पाणी चढविलें

आहे, ह्मणून अभिमानानें लोकांस सांगतां. आमची पंढरी सुवर्णाच्या कोंदणानें जडलेली असून त्या ठिकाणीं कल्पतरूचीं झाडें आहेत व वृंदावन रत्नजडित असून, देवाधिदेव पुंडलिकाचे भक्तीसाठीं कटेवर कर ठेवून भक्तांची वाट पाहत आहे. आणि तेतीस कोटी देव हात जोडून विनंती करीत आहेत कीं पंढरीसारखें क्षेत्र व चंद्रभागेसारखें तीर्थ त्रिभुवनांत नाहीं. तुझी ही अंबिका आमच्या पंढरींत येऊन नेहमी सडा सम्मार्जन करीत असते. असें ऐकतांच आपल्या देवीची निंदा केल्याबद्दल राजाला क्रोध येऊन त्यानें ब्राह्मणास शिक्षा करण्याचा विचार केला. तेव्हां ब्राह्मण ह्मणाला—मी सांगितल्याप्रमाणें जर तुमची अंबिका पंढरींत नसेल तर मग मला शिक्षा करावी. असें त्या ब्राह्मणाचें भाषण ऐकतांच राजा प्रधानादि मंडळीसह पंढरीस पांडुरंगाच्या दर्शनास निघाला. तेव्हां ब्राह्मण पांडुरंगाचा धांवा करून ह्मणाला—देवा—तुझें नांव सांगून मी आपला निर्वाह करीत असतों तरी आतां माझा हेतु न पुरविशील तर राजा मला शिक्षा करील. अशीं करुणावचनें पांडुरंगांनीं ऐकतांच जशी द्वारका होती तिच्यापेक्षांही दुप्पट गुणानें पंढरीची रचना करून ठेविली. राजा पंढरींत येतांच, ब्राह्मणानें सांगितलेल्या गोष्टींची त्याला प्रचीति आली व महाद्वारांत, देवी झाडीत असलेली राजाच्या दृष्टीस पडली; तेव्हां राजा ह्मणाला—आहे,

तूं येथें कां आलीस ? देवी बोलली—तूं अभिमान धरून ब्राह्मणास उगाच गांजलेंस, अरे ? माझ्या सारख्या हजारों दासी पंढरीस रात्रंदिवस रहात आहेत. व सर्व तीर्थें या पुंडलिकाचे आंगणांत लोळण्या घेत आहेत. असें ऐकतांच राजास आश्चर्य वाटून पुढें जाऊन पाहूं लागला. तों नारदतुंबरादिकांचें गायन चाललें आहे नंतर पुढें जाऊन देवाचें दर्शन घेऊन ब्राह्मणाचे उपकार आठवून नामस्मरण करूं लागला तेव्हां देवांनीं रचिलेली माया अदृश्य केली. असें पाहतांच राजास आश्चर्य वाटून देवास ह्मणाला—हे प्रभो, तुह्मांस अविद्या नगरीस न्यावें असा माझ्या मनाचा हेतु आहे. तरी मला अभय होऊन मजबरोबर चला. देव ह्मणाले—मी येतों पण मला जर जमिनीवर ठेवशील तर तेथेंच राहीन आणि तूं कांहीं अन्यायकरशील तर पंढरीस परत येईन. असें सांगतांच राजानें तें कबूल करून दोन बाजूनें मनुष्यें अविद्यानगरी पर्यंत उभीं करून हातोहातीं पांडुरंगास अविद्यानगरीस आणून तेथें त्याचें स्थापन केलें.

इकडे आषाढमासीं यात्रेस भक्त येऊन पाहतात तों तेथें देव नाहीं. तेव्हां संत ह्मणाले—आह्मांस टाकून पांडुरंग गेला; आतांभजन कोणाचें करावयाचें ? आज पुंडलिकास दिलेला वर खोटा झाला. असें बोलतांच, एक संत

ह्मणाला–पांडुरंग अविद्यानगरीस गेले आहेत, त्यांस जाऊन आणावें. असें ऐकतांच भानुदास पांडुरंगास आणावयास निघाला. अर्धरात्रीच्या सुमारास सर्वलोक निजल्यावर भानुदास विठोबाजवळ आला तोंच दाराचीं कुलुपें गळून दरवाजा उघडला तांच भानुदास देवाला नमस्कार करून ह्मणाला–देवा ? आमची गरीबाची पुजा अव्हेरून तूं राजाचे पूजेस मान देऊन राहिलास. आणि पुंडलिकास " येथून मी जाणार नाहीं. " हा दिलेला वर खोटा केलास. असें ऐकून देव ह्मणाले–राजानें मला येथें बंदीत आणून टाकलें आहे तरी तूं आतां बिऱ्हाडीं जा. उद्यां राजा पूजा करून गेला ह्मणजे तुला दर्शन देईन. असें सांगून नवरत्नांचा हार भानुदासाच्या गळ्यांत घालून त्यास लावून दिला. सकाळीं राजा स्नान करून काकडआरतीस आला व पाहतो तों देवाच्या गळ्यांत हार नाहीं. ह्मणून शोध करूं लागला. पण कोठें थांग लागेना. ह्मणून चाकरांस चोराचा पत्ता लावण्यास हुकूम दिला त्यावेळीं भानुदास नदीवर स्नान करीत असतां, त्याच्या गळ्यांत असलेला हार चाकरांच्या दृष्टीस पडला. तेव्हां चाकरांनीं त्याला राजाकडे आणिलें, राजानें त्यास शूळावर देण्याचा हुकूम केला, त्यावेळीं भानुदासानें मरण सन्निध आलें असें जाणून

पांडुरंगाचा धांवा केला, व राजास ह्मणाला–मला शेवटचें देवाचें दर्शन घेऊं द्या. असें सांगतांच त्याला देवळांत नेऊन सोडला. भानुदास देवास नमस्कार घालून ह्मणाला–देवा, मी तुला न्यावयास आलों ह्मणून मला ही शिक्षा देवविलीस ना ? असें बोलून नमस्कार करून, शूळापाशीं आणून वर चढविलें ! तों त्या शूळाचें झाड होऊन त्यावर फळें आलीं. अशी बातमी सेवकांनीं राजास कळवितांच राजा तेथें येऊन भानुदासाचे चरण धरिता झाला. नंतर त्याला देवळांत आणिलें. तोंच देवानें त्याला आलिंगन देऊन पोटाशीं धरिलें व चल आपण पंढरीस जाऊं असें ह्मणाला. असें ऐकतांच राजा ह्मणाला–देवा, तूं मला टाकून कां जातोस? देव ह्मणाले–तूं अन्याय केलास ह्मणून मी जातों. नंतर देव भक्ताच्या खांद्यावर बसून पंढरीस आले व उभयतांनीं चंद्रभागेवर स्नान करून देव भानुदासास ह्मणाले–मी येथें उभा राहतों तूं देवळांत जाऊन भक्तांस घेऊन ये. त्याप्रमाणें भानुदास देवळांत जाऊन सर्व वृत्तांत कळवून दिंडी, पताका, वाद्यें घेऊन भक्तमंडळी देवास घेऊन आली व देवास सिंव्हासनावर स्थापून पूजा करून नैवेद्य दाखवून मंगल आरती केली. व भानुदासाची स्तुति करूं लागले.

---

# गोष्ट ४४ वी.

## बहिरंभट व नागनाथ.

पैठणांत वेदशास्त्री बहिरंभट नांवाचा एक ब्राह्मण राहत होता. त्याचा नित्यक्रम असा होता कीं, दररोज गंगेवर जाऊन स्नान करून जप, अनुष्ठान करून नंतर भोजन करावें. एके दिवशीं तो भोजनास बसला असतां, बायकोस ह्मणाला-तूं अळणी भाजी मला कां वाढलीस ? बायको ह्मणाली-आपलें ह्मातारपण झालें; आतां एवढी चव कशाला पाहिजे; असें ऐकून त्याला अनुताप होऊन तसाच उठला आणि बायकोला नमस्कार करून ह्मणाला-तूं मला चांगला उपदेश दिलास. असें बोलून आतां कोठें जावें अशा विचारांत आहे; तो मनांत ह्मणाला-आतां मी अरण्यांत गेलों तर लोक परत आणतील, संन्यास ग्रहण केला तर माझी पूजा करतील. तरी यवन व्हावें ह्मणजे आपल्याला कोणाचाही त्रास नाहीं. असा विचार करून काजीच्या घरीं जाऊन त्यास ह्मणाला-तुह्मीं मला आपल्या जातींत घ्यावा. असें ऐकतांच काजी ह्मणाला-भटजी, आपण उदास कां झालां ? व तुमची वासना पालटली कां तें सांगा. ब्राह्मणानें सांगितलें-भगवंताच्या भक्ती करितां तुमच्या जातींत मी येतों. असें ऐकतांच काजीनें त्याला बाटवून टाकला. तेव्हां सर्व लोक त्याला अनेक

प्रकारें निंदूं लागले. एके दिवशीं गंगेवर सर्व ब्राह्मण जमले असतां बहिरंभट तेथें येऊन रडूं लागला. त्यास ते ब्राह्मण ह्मणाले—तूं कोणता सद्गुण पाहून यवन झालास ? बहिरंभटानें सांगितलें—मी आपल्या कर्माच्या गतीनें अविचारांत पडलों व ईश्वरप्राप्तीसाठीं यवन झालों; पण येथें सुद्धां कांहीं दिसत नाहीं. असें ऐकतांच ब्राह्मणांनीं विचार केला कीं, हा आपल्या कर्मानें भ्रष्ट झाला आहे, तर त्याला विधियुक्त प्रायश्चित्त देऊन शुद्ध करावा. असें बोलून अपार द्रव्य खर्चून त्यास प्रायश्चित्त देऊन पवित्र केलें. तेव्हां सर्व यवन जमून ब्राह्मणांस ह्मणाले—तुह्मीं मुसलमानाचा ब्राह्मण कसा केला तें राजावजळ सांगावयास चला. तेव्हां बहिरंभट ह्मणाला—मी ब्राह्मण असतां मला यवन तुह्मीं कसें केलें ? माझ्या कानाला भोकें असतां, यवन झाला, असें ह्मणावयास तुह्मांस लाज कशी वाटत नाहीं ?याप्रमाणें यवनांबरोबर वाद चालत असतां, ब्राह्मणांस ह्मणाला-तुह्मीं मला प्रायश्चित्त देऊन शुद्ध केलें व आपणांत घेतलें तर तें तुमचें धर्मशास्त्र कोणतें तें सांगा. माझ्या आंगाला गोमय लावून शुद्ध केलें पण माझ्या आंगाचा डाग गेला नाहीं; तर मी वर्णहीन झालों- असें बोलतांच हा वेडापिसा असें समजून ते यवन व ब्राह्मण आपापल्या घरीं गेले. तेथून तो हिंडत हिंडत वडवालेस आला. त्या ठिकाणीं नागना-

चे समाधीचें काम चाललें होतें. तिला दगड आणण्याकरितां गाड्याला माकडें जुंपलेलीं होतीं; तीं पाहतांच त्याला मोठें आश्चर्य वाटलें व नागनाथाला ह्मणाला-मी यवन कीं, हिंदु तें सांगावें. असें बोलतांच नागनाथानें त्याच्या कपाळावर काठी मारली. त्या बरोबर त्याला मूर्च्छना येऊन तेथेंच पडला. नंतर नागनाथानें उखळ व मुसळ आणून, शिष्याकडून त्याच्या देहाचें कांडण केलें व अस्थि आणि मांस गोळा करून त्याची नागनाथानें मूर्ति बनविली. आणि अग्नींत घातली. असें पाहतांच सर्व जनांस मोठें आश्चर्य वाटलें. अग्नि शांत होतांच नागनाथानें बहिरंभटास विचारिलें, आतां तूं कोण आहेस ? बहिरंभटानें सांगितलें, आतां माझा संशय निरसन झाला. असें बोलून त्यानें मौन धरिलें. नंतर नागनाथानें त्यास उपदेश करून ज्ञान प्राप्त करून दिलें. तेथून तो पंढरीस येऊन पांडुरंगाचें दर्शन घेऊन हरिभजन करीत राहिला.

---

## गोष्ट ४५ वी.

### एकनाथचरित्र.

एकनाथ हा भानुदासाचा पणतु पैठणांत रहात असे. तो गुरूच्या घरीं हिशोबाच्या कामावर होता. एके दिवशीं जनार्दन गुरूजीनें एकनाथास सांगितलें आज हिशोबाच्या व-

ह्मा आणून दाखीव. असें गुरूचें वचन ऐकतांच, एकनाथाचे हातून एक पैची चूक हिशोबांत झाली होती. ती शोधण्यासाठीं तो रात्रौ दिवा लावून हिशोब तपासूं लागला व ती पैची झालेली चूक आढळतांच, त्याला मोठा आनंद होऊन टाळ्या वाजवूं लागला. असें पाहतांच गुरुजीनें त्याला विचारिलें–तुला आनंद कशाचा झाला ? तेव्हां एकनाथानें खरें वर्तमान सांगितलें. तें ऐकतांच गुरुजी ह्मणाले–इतकें लक्ष्य जर तूं कृष्णचरणीं लाविलें असतेंस तर तुला महत्फल प्राप्त झालें असतें. असें ऐकून एकनाथ गुरुचरणीं लीन झाला. तोंच जनार्दनानें रामकृष्ण मंत्राचा त्याला उपदेश दिला व दत्तात्रेयाचे दर्शनाकरितां त्याला बरोबर घेऊन अरण्यांत गेला. जनार्दनांनीं दत्तात्रेय मूर्ति पाहतांच साष्टांग नमस्कार घालून, दोघेही बोलत बसले. एकनाथ यवनरूपी दत्तात्रेयास पाहून भिऊन लांब जाऊन उभा राहिला. नंतर दत्तात्रेय व जनार्दन एका ताटांत जेवावयास बसले. तेव्हां दत्तात्रेयांनीं तो पलीकडचा मुलगा कोण ? ह्मणून जनार्दनास विचारिलें. व ह्मणाले–त्याला भोजनास बोलवा. असें ऐकतांच एकनाथ तेथून पळून गेला. तोंच दत्तात्रेय गुप्त झाले. नंतर एकनाथ गुरुजवळ येऊन ह्मणाला— महाराज, तो यवन कोण व आपण त्याच्या बरोबर

मूर्ती! तुला न समजून तूं पळून गेलास. असें सांगून ह्म-
ले– तुला आणखी एकवेळ दत्तात्रेयदर्शन देईन; त्यावेळीं तूं
वध राहा. नंतर कांहीं दिवसांनीं पुनः त्याला अरण्यांत
ले. त्या ठिकाणीं दत्तात्रेय अमंगल वेषानें येऊन बसले व
मथतांच्या गोष्टी होऊन भोजनास बसले. तेथें एकनाथा-
ही बोलाविलें. एकनाथ आपल्या मनांत ह्मणाला– हा
कीर! याच्या बरोबर आपण कसें जेवावें. तोंच जनार्द-
नें खुण केली; त्या बरोबर एकनाथानें प्रसाद घेऊन व-
त्रांत बांधून ठेविला. भोजन आटोपल्यावर एकनाथाविष-
यीं दत्तात्रेयांनीं जनार्दनास विचारतांच गुरुजीनें एकनाथा-
ला दत्तात्रेयाच्या चरणावर घातलें. तेव्हां त्यांनीं वर दिला
कीं, "हा श्रीहरीचें चरित्र रचून, जनांचा उद्धार करील, भा-
गवत संस्कृत आहे तें प्राकृत करील" असा वर देऊन दत्ता-
त्रेय गुप्त झाले.

---

## गोष्ट ४६ वी.

### देव एकनाथाचे नोकर होतात.

एकनाथानें भक्तीच्या योगें पांडुरंगास आपलेंसें करून घेतलें. एकनाथास पूजेचें साहित्य देण्यास कोणी नाहीं असें देवांनीं जाणून, एका गरीब ब्राह्मणाचें रूप घेऊन पैठणास आले व एकनाथाकडे जाऊन ह्मणाले– मी निराधारी ब्रा-ह्मण आपली कीर्ति ऐकून आलों आहें. तरी मला अन्नव-

स्व देऊन आपणाकडे ठेवावें. तुह्मीं सांगाल तें काम करण्यास मी सिद्ध आहे. असें ऐकून एकनाथानें त्याला आपणाकडे ठेवून घेतलें. त्यानें दररोज कावडीनें गंगेचें पाणी भरावें, लुगडीं, धोतरें धुवावीं, सडा संमार्जन करावें, स्वयंपाक करावा, खरकटीं भांडीं घांसावीं. याप्रमाणें कामें एकनाथाचे घरीं देव स्वतः करूं लागले. त्यानें आपलें कृष्णा नांव सांगितलें होतें. पण त्याचे हातचें अन्न पाणी विशेष गोड लागे, सबब त्याला श्रीखंड्या असेंही ह्मणत असत.

पुढें कांहीं दिवसांनीं एकनाथाच्या वडिलांची तिथि आली. त दिवशीं श्रीखंड्यानें ब्राह्मणांस आमंत्रण देऊन भोजनाची तयारी केली फक्त एकनाथ स्नानाचे राहिले होते. त्या अन्नाचा सुवास सुटल्याकारणानें, रस्त्यावर एक अंत्यज आपल्या स्त्रीसह काम करीत होता. त्यांचीं मनें त्या अन्नावर गेलीं. असें एकनाथानें जाणून घरांत बायकोस जाऊन सांगितलें. ती पतिव्रता स्त्री ह्मणाली—त्या दोघांसच जेवण घातलें व सर्वांस कळलें तर मग तींही येतील, याकरितां त्यांच्या सर्व गोतास बोलवावें. असें बायकोचें वचन एकनाथास मान्य होऊन, गांवांतील सर्व महार बोलावून, त्यांस तें झालेलें अन्न अर्पण केलें आणि पुनः सडा संमार्जन करून ब्राह्मणांकरितां नवीन अन्न निर्माण केलें. ही बातमी त्या ब्राह्मणांस कळतांच, ते एकनाथाकडे

येऊन नानाप्रकारें बोलूं लागले. तेव्हां एकनाथ ह्मणाला—त्या अन्नाचा स्वाद महारांनीं घेतल्यामुळें तें निषिद्ध अन्न महारांस अर्पण केलें. तुमच्या करितां नवीन पक्वान्न सिद्ध आहे. तरी कृपा करून भोजन करा. हें एकनाथाचें बोलणें अमान्य करून त्याला वाळीत टाकलें. तेव्हां एकनाथाला विचार पडला. इतक्यांत श्रीखंड्या ह्मणाला—तुह्मीं त्याबद्दल काळजी कां करितां? ब्राह्मण रुसून गेले तर त्यांचे पितर येथें जेवावयास येतील. असें बोलून सर्व तयारी होतांच, श्रीखंड्यानें "आगच्छन्तु" असें ह्मणतांच रामभट, गणभट, सोमभट यांचे वडील येऊन भोजनास बसले. त्यांच्याबरोबर एकनाथाचेही पितर आले होते. असें पाहतांच एकनाथानें मोठ्या आनंदानें श्राद्धविधि करण्यास सुरवात केली.

एकनाथ पुढें काय करितो तें पाहण्याकरितां गांवांतील कुटिल लोक पाळतीवर राहिले व ब्राह्मण गोळा करून एकनाथाच्या घरांत डोकावून पाहूं लागले, तों प्रत्यक्ष आपले पितर येऊन जेवीत आहेत असें त्यांस दिसलें. तेव्हां ते चकित होऊन हा काय प्रकार आहे याचा विचार करूं लागले तोंच सर्व पितर गुप्त झाले. असें पाहतांच सर्व ब्राह्मण ह्मणाले—याला पांडुरंग साह्य आहे. आपण उगाच याचें छळण केलें. कांहीं ब्राह्मण ह्मणूं लागले कीं, पक्वान्नें

मिळावयाचीं तीं जाऊन हातचो दक्षिणाही गेली. तरी एकनाथास कांहीं नीति सांगुन प्रायश्चित्त द्यावें. असें बोलून एकनाथाला अनेक गोष्टी सांगून त्याला वाळवंटांत नेऊन प्रायश्चित्त देऊं लागले. तों त्या ठिकाणीं सर्वांगास कुष्ठ झालेला एक ब्राह्मण त्र्यंबकेश्वराहून एकनाथाचा शोध करीत आला व ह्मणाला एकनाथ कोठें आहे ? त्याच्या पदरीं अन्त्यजांस अन्नदान केल्याचें पुण्य आहे, त्यांतील किंचित पुण्य मला मिळेल तर माझें कुष्ठ जाईल. असें सांगुन एकनाथाजवळ आला व स्वप्नदृष्टांत सांगुन एका अन्त्यजाचे अन्नदानाचें पुण्य मागूं लागला. तेव्हां एकनाथानें त्याचे हातावर पाणी घातलें. त्या बरोबर त्याची काया सुंदर झाली असें पाहतांच त्या सर्व ब्राह्मणाचे अहंपणाचें निरसन झालें व एकनाथाची स्तुति करूं लागले.

द्वारावतींत एक ब्राह्मण पांडुरंगाच्या भेटीकरितां तप करीत असतां रुक्मिणी त्याच्या स्वप्नांत जाऊन ह्मणाली—तूं पैठणांत जाऊन एकनाथाचे येथें श्रीखंड्या नामें ब्राह्मण आहे, तोच पांडुरंग होय, त्याला जाऊन घेऊन यावें. असा दृष्टांत पाहून तो पैठणांत एकनाथाचें घर विचारीत आला एकनाथानें त्याला बसावयास आसन दिलें व आपण कोण कोठील ह्मणून प्रश्न केला. तेव्हां ब्राह्मण ह्मणाला—तुमच्या येथें श्रीखंड्या नामें ब्राह्मण आहे त्याचे दर्शनाकरितां मी आलों आहें. एकनाथ बोलला-तो पाणी आणावया-

करितां गेला आहे तो आतां येईल. असें सांगतांच, श्रीखं-
ड्या पाण्याची कावड घेऊन आला तोंच त्या ब्राह्मणानें त्याच्या चरणावर मस्तक ठेविलें. तेव्हां देव मनांत ह्मणाले— आजपर्यंत मी येथें आनंदानें रहात होतों, परंतु हा आनंदाच्या आड आला असें वाटतें. असें बोलून घरांत कावड ठेवावयास गेला तेथेंच गुप्त झाला. बाहेर ब्राह्मण व एकनाथ वाट पाहत बसले. ह्मणून माजघरांत जाऊन पाहूं लागले तों घरांत कोणीच नाहीं. असें पाहतांच एकनाथ शोक करूं लागला व त्या ब्राह्मणास ह्मणाला—धन्य धन्य असो तुमचें. तुमचें भाग्य मोठें ह्मणून पांडुरंगास आपण ओळखिलें. असें बोलून एकमेकांनीं आलिंगन दिलें व देवाचा धांवा करून एकनाथ व त्याची स्त्री देवाचे अनन्यभावें गुण आठवून स्तुति करूं लागलीं.

पुढें एके दिवशीं एकनाथ निजला असतां; ज्ञानदेव स्वप्नांत येऊन ह्मणाले—"तूं आळंदीस येऊन माझी समाधी उघडून एक वृक्षाचा मुळी आडवी आली आहे, ती काढून टाकून पुनः समाधी बुजवून टाकावी" असें स्वप्न पाहून एकनाथानें आळंदीस येऊन इंद्रायणीचें स्नान करून सिद्धेश्वराचें दर्शन घेतलें व समाधी उघडून ती वृक्षाची मुळी काढून पुनः समाधी बंद केली. त्यावेळीं आळंदी ओसाड पडली होती त्या ठिकाणीं शिधासामुग्री कांहींच मिळेना. त्या एकनाथाचे शिष्य क्षुधातुर होतांच तेथें पंढरीनाथानें वाण्याचें रूप

घेऊन दुकान मांडलें. तें पाहतांच एकनाथास आनंद होऊन सामुग्री आणावयासाठीं एका ब्राह्मणास पाठविलें. तो ब्राह्मण वाण्याचे दुकानीं येऊन सर्व साहित्य घेऊं लागला, तेव्हां वाणी ह्मणाला-आह्मीं आजचा दिवस येथें आहों. एकनाथास आह्मी ओळखतों पण तो ओळखीत नाहीं. तुह्मांला काय सामुग्री लागेल ती न्या. असें ऐकतांच ब्राह्मणानें सर्व साहित्य पदरांत घेतलें व पैसे मग आणून देतों असें सांगितलें. तेव्हां वाणी बोलला. तुह्मी स्वयंपाक करून जेवा आणि मग पैसे आणून द्या. असें ऐकून तो ब्राह्मण मागें फिरला तोंच वाणी व त्याचें दुकान गुप्त झालें. असा चमत्कार पाहतांच, त्या ब्राह्मणानें तें एकनाथास कळविलें. तेव्हां आमच्या साठीं पंढरीनाथ फार श्रमले, असें एकनाथ ह्मणाला-नंतर भोजन झाल्यावर कीर्तन करून समाधीला नमस्कार केला व दुसरे दिवशीं एकनाथ पैठणांत येऊन सप्रेम भावें भजन करीत राहिला.

## गोष्ट ४७ वी.

### रामदास.

कृष्णेच्या तीरीं जांबनगर ह्मणून गांव आहे तेथें एक ब्राह्मण, रामाचा भक्त रहात असे. तो धर्मशील असून, अन्नदानाचें पुण्य संपादन करीत होता, तो दरवर्षी रामजयंतीचा उत्सव मोठ्या थाटानें करून, साधु-

संतांचा गौरव करीत असे. परंतु त्याच्या पोटीं कांहीं संतान नसल्यामुळें त्याची बायको रात्रंदिवस काळजी करीत असे. एके दिवशीं ब्राम्हणाचे स्वप्नांत रामानीं सांगितलें कीं " तुला मूर्तिमंत मारुति सारखा पुत्र होईल " असा स्वप्नदृष्टांत होतांच आनंद पावुन बायकोस सांगता झाला. पुढें त्याच्या बायकोस नवमास होतांच पुत्र झाला. त्याचें नांव रामदास असें ठेविलें. तो थोर झाल्यावर त्याचा व्रतबंध करून, त्यास वैदिक ज्ञानाचा उपदेश करविला. नंतर त्याचा लग्नाचा बेत केला. त्या समयीं ब्राम्हणांनीं सावधान म्हणतांच रामदास म्हणाला– तुम्हीं सावधान कोणाला म्हणतां ? ब्राम्हण म्हणाले–आज पासून तुला संसारबंधन पडलें, म्हणून सावध हो, असें आम्ही सांगत आहों. असें ऐकतांच त्याच्या मनाला पश्चात्ताप होऊन तो वनांत निघाला. तेव्हां त्याचीं आईबापें त्यास न जाण्याविषयीं सांगूं लागलीं पण तें तो न ऐकतां, अरण्यांत जाऊन रामाचें ध्यान करूं लागला. त्याची एकनिष्ठ भक्ति पाहून तेथें भयंकर रूपानें मारुति आले. परंतु त्याला रामदास न भितां आलिंगन देऊन मला रामाचें दर्शन द्या. म्हणून प्रार्थना करूं लागला. नंतर मारुति त्यास अभय देऊन गुप्त झाले रामदास तेव्हां गांवांत जाऊन, भिक्षा मागून जें कांहीं आणीत असे तें भक्षण करून श्रीरामाचें भजन करीत असे. त्याच्या जवळ कोणी मनुष्य आलें तर

तो त्यापासून दूर पळत असे. एके दिवशीं आषाढमासीं पंढरीस यात्रा चालली असतां मारुति रामदासाजवळ येऊन म्हणाले–तुला राम लवकरच दर्शन देतील. असें ऐकून रामदास त्या यात्रेकऱ्यांबरोबर पंढरीस आला, महाद्वारीं येतांच गरुड हनुमंत दृष्टीस पडले. त्यांस नमस्कार करून पुढें पाहतो तों, विटेवर पांडुरंग उभे आहेत. असें पाहतांच म्हणाला–मी ज्याचें ध्यान करितों तो येथें दिसत नाहीं, मग याची भेट कशाला घ्यावी? मी येथें आलों खरा पण कोणाला भेटावें, किंवा कोणाला नमस्कार करावा हें मला कांहीं आठवत नाहीं. असें बोलून मला भेट दे म्हणून श्रीरामाची अनन्यभावानें प्रार्थना केली. तेव्हां त्याचा निश्चय पाहून रुक्मिणीपतीला संतोष वाटून आपलें रूप पालटून रामरूप धारण करून त्यास आलिंगन दिलें व म्हणाले—आतां माझें हेंच रूप ध्यानीं धरून भजन करीत जा. असें सांगून पुनः विठ्ठलरूप धारण केलें. असें पाहतांच रामदासास आश्चर्य वाटून राम आणि पांडुरंग यांत भेद नाहीं असें समजला व प्रेमभावानें भजन करूं लागला. नंतर तेथील गोपाळकाला झाल्यावर रामदास देवाची आज्ञा घेऊन आश्रमास जाण्यास निघाला तों वाटेंत जेजुरीगांव लागला. तेथील म्हाळसाकांताला रामदास आल्याचें समजतांच म्हणाला–ज्यानें पांडुरंगाला नमस्कार

केला नाहीं तो आपल्यास कसा भेटेल ! तरी मनुष्यरूपानें त्यास भेटावें. त्यावेळीं शिवाजीराजा राज्य करीत होता. ह्मणून ह्माळसाकांतानें शिवाजीचें रूप घेऊन कपाळाला भंडारा लावून घोड्यावर बसून रामदासाजवळ आले व त्यांस आलिंगन दिलें आणि ह्मणाले–पंढरीस येतां जातां आह्मांस दर्शन देत जा. आह्मी गडावर राहतों. जे निरंतर रामभजन करितात ते आह्मांला जिवापलीकडे आवडतात. असें बोलतांच रामदास त्यास उत्तर देणार तोंच ह्माळसा कांत गुप्त झाले. असें पाहतांच रामदासांस मोठें नवल वाटून मनांत ह्मणाले–कीं, हे ह्माळसाकांत आले असावे. तरी त्यांच्या दर्शनास जावें. असा विचार करून त्यांनीं गडावर मंदिरांत जाऊन नमस्कार करून तेथें एक कीर्तन केलें. नंतर तेथून जांबगावास येण्यास निघाले तों शिवाजी राजा भेटीस आला. त्याला रामदासांनीं उपदेश दिला. व पुष्कळ लोकांस आपले शिष्य केले. त्यानें दासबोध नांवाचा एक ग्रंथ रचिला आहे, तो ऐकिला असतां सर्व प्राणी जीवन्मुक्त होतात.

## गोष्ट ४८ वी.

### तुकाराम.

आळंदीपासून सहाकोसांवर देहू ह्मणून एक गांव आहे, तेथें तुकाराम आंबके या उपनावाचा वाणी रहात

होता. तो व्यापारांत कधींही असत्य भाषण करीत नसे. त्याच्या दोन बायका होत्या. त्याच्या जवळ पुष्कळ धन-संपत्ति होती, परंतु दुष्काळ पडल्यामुळें त्याच्या जवळील सर्व संपत्ति सरून गेली. थोरल्या बायकोला दोन मुलगे होते. त्या दुष्काळांत थोरली बायको मरण पावली. असा कठिण काळ आलेला पाहतांच, तुकाराम लज्जित होत्साता हा प्रपंच लटका असून ही काया नाशिवंत आहे. असें समजून ह्मणाला–मी पंढरीनाथास विसरून आपला जन्म व्यर्थ घालविला. असा मनाचा निश्चय करून, जुनाट एक पांडुरंगाचें देऊळ होतें, तें सारवून त्या देवाची पूजा अर्चा करीत आनंदानें कीर्तन करूं लागला. कोणी क्षुधार्थी किंवा अन्नार्थी आल्यास त्यास आपणाजवळ जें असेल तें आनंदानें देत असे. घरीं वैष्णव आल्यास त्यांचे चरण धुवून तें तीर्थ प्राशन करीत असे. त्या नंतर त्यास कवित्व रचण्याची स्फूर्ति झाली. याचें कारण असें झालें कीं, मागें नामदेवानें पांडुरंगाजवळ शतकोटी अभंग करण्याची प्रतिज्ञा केली होती. तेव्हां देव ह्मणाले—नाम-देवा, तूं प्रतिज्ञा करतोस खरी, पण ती सिद्धीस जाणार नाहीं. कारण कलियुगांत आयुष्याची मर्यादा शंभर वर्षांची असून त्यांतही अपवाद आहेत. असें ऐकतांच नामदेव पांडुरंगाच्या चरणावर मस्तक ठेवून ह्मणाला—देवा, तुझ्या कृपेनें सर्व कांहीं होईल; तरी माझा पण

सिद्धीस न्यावा. असें नामदेवाचें वचन ऐकतांच, पांडुरंगांनीं सरस्वतीला त्याच्या जिव्हेवर बसण्याची आज्ञा केली. तेव्हां सरस्वती ह्मणाली—मी नामदेवाचे मुखें कवित्व बोलवितें, परंतु चपळ लिहिणारा कोणी तरी पाहिला पाहिजे. असें वचन ऐकतांच पांडुरंगांनीं तें लिहिण्याचें काम स्वतः पत्करिलें. त्या कवित्वाची गणती नवलक्षांची झाली. नंतर पांडुरंगांनीं नामदेवाचा हात धरून, तुकारामाच्या स्वप्नांत जाऊन सांगितलें कीं, पुढील कवित्व तूं आपल्या वाणीनें वदून शतकोटीची संख्या पूर्ण करावी. असा स्वप्न दृष्टांत होतांच तुकाराम जागा होऊन पाहतो, तां जवळ नामदेव किंवा पांडुरंग यांपैकीं कोणीच नाहीं. तरी दृष्टांत तीच आज्ञा असें समजून, तुकाराम कवित्व रचूं लागला. तेव्हां निंदक निंदा करूं लागले. पण तुकाराम त्याचकडे लक्ष्य न देतां आनंदानें हरिभजन करीत असे.

एके दिवशीं शिवाजी राजा तुकारामाची कीर्ति ऐकून त्याच्या भेटीस निघाला. त्यावेळीं मुसलमानी राज्य होतें. ह्मणून कोणास न कळतां शिवाजी पुण्यास आला. तेथें एका वाण्याचे घरीं तुकारामाचें कीर्तन चाललें होतें, तेथें शिवाजी जाऊन एका ताटांत होन व मोहरा ठेवून तें ताट तुकारामापुढें ठेविलें. तेव्हां तुकाराम ह्मणाला—आपण हें जें द्रव्य आणिलें आहे तें आह्मांस गाईच्या मांसाप्रमाणें

आहे. असें ऐकतांच शिवाजी लज्जित झाला. तेव्हां तुकाराम पुन: ह्मणाला–आमचें समाधान व्हावें, अशी जर तुमची इच्छा असेल तर तुह्मीं निरंतर विठ्ठलनामस्मरण करावें. असें ऐकतांच शिवाजीस संतोष वाटून साष्टांग नमस्कार घातला. शिवाजी पुण्यास आल्याची बातमी मुसलमानास कळतांच, त्याला पकडण्याकरितां दोन हजार पठाण चाकणाहून पाठवून दिले ते त्या वाण्याच्या घराभोंवती वेढा देऊन, कीर्तनांत हेर पाठवून शिवाजीस धरून आणण्याची त्यांनीं आज्ञा केली. शिवाजीला पकडण्या करितां सैन्याचा वेढा पडला आहे, अशी बातमी कीर्तनांत तुकारामाचे कानीं गेली. तेव्हां तुकाराम सर्वांस ह्मणाला–तुह्मी गडबड करूं नका; स्वस्थ बसा.कीर्तनांत शिरलेले हेर शिवाजी ओळखत नाहींत;असें पाहून बाहेर येऊन सांगूं लागले–तेव्हां ते पठाण ह्मणाले–शिवाजी जर ओळखत नाहीं तर कथेंत बसलेल्या सर्व लोकांस ठार मारावें, ह्मणजे त्यांतच शिवाजी सांपडेल. असा हा त्यांचा विचार तुकारामानें अंतर्ज्ञानानें जाणून पंढरीनाथाचा धांवा केला. तो ककणावाणी ऐकतांच पांडुरंग धांवत येऊन तुकारामाचे कानांत सांगूं लागले कीं तूं निर्विघ्नपणें भजन कर. परचक्र आलें आहे त्याचें निवारण मी करितों असें सांगून कीर्तनांत बसलेल्या मंडळीस न कळतां देवांनीं कौतुक केलें तें असें कीं, ज्या वाड्यांत कीर्तन चाललें

होतें तेथें देव प्रगट होऊन ह्मणाले-तो पहा राजा पळून गेला. असें ऐकतांच सर्व पठाण घाबरे होऊन मागें पुढें पाहूं लागले. तों सर्वांच्या पुढें शिवाजीचा वेष घेतलेला पांडुरंग धांवूं लागला. त्याच्या मागें सर्व सैन्य धांवूं लागलें. ती रात्रीची झालेली गडबड ऐकतांच नगरांतील लोक पाहूं लागले. आणि ह्मणाले-शिवाजीच्या मागें यवन धांवत सुटले आहेत, आतां यांतून राजाचा बचाव होणें कठीण दिसतें. नंतर पांडुरंगांनीं त्या सैन्यास पाठीमागून वीस कोसांच्या अंतरावर नेलें त्याठिकाणीं डोंगर असून कांट्यांचें वन होतें. त्या वनांत सर्वांस सोडून देव गुप्त होऊन कीर्तनांत येऊन प्रेमानें नाचूं लागले. इकडे कीर्तनांतील लोक राजास ह्मणाले-जें परचक्र आलें होतें तें आपो-आप निघून गेलें. नंतर कीर्तन आटोपल्यावर राजा बि-ऱ्हाडास जाऊं लागला, तेव्हां नगरांतील लोक राजास ह्मणाले-रात्रीं तुमच्या सारखाच कोणी मनुष्य यवनांनीं पिटाळीत नेला. तो त्यांच्या हातांतून कसा वांचला असेल कोण जाणे. असें ऐकतांच शिवाजीला चमत्कार वाटून, पांडुरंगानें आपणास संकटांतून वांचविलें असें समजला.

एके दिवशीं शिवाजी राजा मनांत ह्मणाला कीं, तुकाराम यास द्रव्य दिलें तर तो घेत नाहीं; तरी त्याचे घरीं धान्य घेऊन जावें. असा विचार करून शिवाजी कांटकी

वस्त्रें अंगावर घेऊन दोन मण धान्य बैलावर घालून तुकारामाचे घरीं आला व ह्मणाला—मी अनाथ तुमच्या चरण हेतु ठेवून हें धान्य आणिलें आहे तें घरांत ठेवावें. असें सांगून धान्यगोणी घरांत टाकून शिवाजी निघून गेल्यावर, तें राजाचें कृत्रिम तुकारामाला कळलें. तेव्हां तुकाराम बायकोस ह्मणाला—हें आणलेलें धान्य आपल्या घरांत जर ठेविलें तर आपल्या सुकृताचें खंडण होईल. याकरितां तें ब्राह्मणांस वाटून टाक. असें ऐकतांच बायकोस संताप चढून ती आपल्या कपाळावर हात मारून घेऊं लागली व ह्मणाली—काय करावें ! बाहेरून आलेलें धान्य तेंही पोरांस खाऊं देत नाहीं. मग संसार तरी कसा चालावा. असें बोलतांच तुकाराम तें धान्य वांटून बायकोस ह्मणाला—अगे आपल्या संचितीं जें असेल तेवढेंच मिळेल. जास्त कोठून घ्यावें !

तुकाराम एके दिवशीं देवालयांत कीर्तन करीत असतां, एक कांसार दररोजच्याप्रमाणें कीर्तन ऐकण्यास निघाला, परंतु त्या दिवशीं त्याचा मुलगा घरांत फार आजारी असल्यामुळें, त्याची स्त्री ह्मणाली—तुह्मीं आज कोठें जाऊं नका. असें जरी बायकोनें सांगितलें तरी त्यानें तें न ऐकतां तो कीर्तनास गेला. मागें त्याचा मुलगा मरण पावला. तेव्हां

ती कांसारीण दुःखानें रुदन करीत, तें मुलाचें प्रेत खांद्यावर घेऊन कीर्तनांत आली व प्रेत तेथें टाकलें, आणि तुकारामाला ह्मणाली. तुह्मीं आमची पाठ कां घेतली ? माझ्या नवऱ्याला तुह्मीं वेडा पिसा केला, तुमची कथा ऐकल्यामुळें माझ्या मुलाचा प्राण गेला, आह्मांस हरिनामाचें पहिल्यापासून वारजिणंच नाहीं. असें एकतांच, श्रोतेमंडळी तिला ह्मणाली-अग कांसारणी तें मुलाचें प्रेत येथें कशाला आणलेंस ? येथें काय अमृतसंजीवनी आहे ? असें मंडळीचें भाषण श्रवण करतांच तुकाराम ह्मणाला-हरिनामाच्या पुढें सुधारस फिका आहे. याची प्रचीति तुह्मांस आतांच दाखवितों पहा. असें सांगून सर्वांस तुकारामानें टाळ्या-वाजवून विठ्ठलनामाची गर्जना करावयास सांगितली. मंडळींनें आनंदाच्या भरांत गर्जना करतांच, तें मुलाचें प्रेत उठून बसलें. असें पाहतांच त्या कांसारणीस आनंद हो-ऊन तुकारामाची निंदा केल्याबद्दल क्षमा मागून ती नमस्कार करूं लागली. व सर्व लोकांस वाटलें कीं, हरिनाम हेंच मृतसंजीवन होय.

---

## गोष्ट ४९ वी.

### तुकारामाची स्त्री संसार दान देते.

तुकारामानें कीर्तनांत प्रेत उठविल्यानंतर तो अरण्यांत

आऊन श्रीहरीचें चिंतन करूं लागला. तेव्हां त्याची बायको शेजारणीशीं नवऱ्याचीं गाऱ्हाणीं सांगूं लागली कीं, बाईगे, काय करूं; आज दोन महिनें माझा नवरा घरींसुद्धां येत नाहीं. धंदा उदिम करावयाचा सोडून, श्रीहरीच्या नांवानें कीर्तन करीत नाचत असतो. त्यामुळं मी रात्रंदिवस झुरणीस लागलें आहें. अशा प्रकारचीं गाऱ्हाणीं दररोज सांगत असे. एके दिवशीं ती पाण्याची घागर भरून जात असतां, तुकारामाची स्वारी स्नान करून देवळांत जाण्याकरितां त्याच मार्गानें निघाली, तेव्हां तुकाराम तिच्या दृष्टीस पडतांच त्याचा पदर धरून ह्मणाली–तूं निर्लज्ज होऊन कीर्तनांत नाचत असतोस, तुला घरादाराची कांहींच चाड नाहीं. तर आमची वाट काय करतोस ती सांग. असें ऐकतांच तुकाराम ह्मणाला–तुझ्या आईबापानें तुझें लग्न केलें त्यावेळीं आमचें घर बघून कां दिली नाहीं ? मी आतां अन्न वस्त्र कोठचें पुरवूं ? बायको ह्मणाली–अशीं घरें दारें कोणी कोणाचीं पाहिलीं होतीं ? तुकाराम ह्मणाला–तर मग माझ्या आईबापांनीं तुला सांगितलें होतें त्याप्रमाणें वर्तन ठेव. ती ह्मणाली–तुह्मीं आईबापें मरून गेलीं त्यांस आतां कोठें शोधावयास जाऊं ? तुकारामानें सांगितलें.माझा बाप पांडुरंग व आई रुक्मिणी यांच्या नामाचें तूं स्मरण कर, ह्मणजे तींच आपल्याला अन्न वस्त्र देतील. असें ऐकतांच ती ह्मणाली-तुह्मीं सांगाल त्याप्रमाणें मी वागेन पण आतां घरीं चला.

मी श्रीहरीचे पाय आठवीन, आणि तोच आपल्याला अन्न वस्त्र देईल. परंतु तुह्मीं घरीं बसून हरिचिंतन करा. असें ऐकतांच तुकाराम ह्मणाला-तूं माझें वचन ऐकशील अशाबद्दल मला भाक दे पाहूं ? तेव्हां तिनें हातावर हात देऊन, ती त्याला घेऊन घरीं आली. तुकाराम घरीं आलेला पाहतांच गांवांतील कुटिल लोक निंदा करूं लागले, परंतु तुकाराम त्याच्याकडे मुळींच लक्ष्य देईना. नंतर तुकाराम वृंदावनाजवळ बसून टाळ विणा हातांत घेऊन बायकोस उपदेश करून ह्मणाला-आपण मुलांलेकरांसहित एके ठिकाणीं नांदूं हा माझा विचार जर तूं ऐकशील तर तझो माझो ताटातूट होणार नाहीं. आतां तूं ह्मणशील कीं मुलें लेंकरें काय खातील ? तरी त्याची चिंता तूं करूं नको. त्यांचे अन्नवस्त्राबद्दल ब्रह्मदेवानें त्यांचे कपाळीं लिहिलें आहे. परंतु तूं आपली चौऱ्याशींच्या फेऱ्यांतून सुटका करून घे. या नाशिवंत देहाची आशा न करितां परमार्थाची प्राप्ति होईल असें कर. उद्यां सोमवार द्वादशी पर्वकाळ आहे. तरी ब्राह्मणांस बोलावून त्यांच्या हातीं घर लुटवून टाक. आपणांस पुढें कसें मिळेल याबद्दल मनांत कांहीं आणूं नको. आपला मायबाप पांडुरंग आहे तो सर्व प्रकारें आपणांस आपदा भोगूं देणार नाहीं. असें नवऱ्यानें वचन श्रवण करून तिनें दुसरे दिवशीं इंद्रायणीचे तीरावर जाऊन स्नान केलें, आणि ब्राह्मणांस बोलावून

घर लुटून टाकिलें. ब्राह्मण घरांतील सर्व चीजवस्त भांडें कुंडें घेऊन गेल्यानंतर एक जटील संन्यासी येऊन घर शोधूं लागला; पण त्यांत त्याला कांहीं मिळालें नाहीं, ह्मणून त्यानें चुलीं-तील राख सर्वांगास फांसली असें पाहतांच सर्व लोक हांसूं लागले. घर लुटल्यानंतर तुकाराम बाहेर निघाले तेव्हां मुलें उपाशी पाहतांच नायको चिंतेंत पडली आणि आतां काय करावें ह्मणून विचार करीत राहिली. इकडे रुक्मिणीनें तुकारामाचें सत्व पाहण्याचा विचार करून, गांवच्या माहा-रणीचें रूप धारण करून तुकारामाजवळ आली आणि ह्मणाली—मायबाप, तुह्मी ब्राह्मणाच्या हस्तें घर लुटविलें तरी मला कांहीं उरलें असल्यास द्या. असें तुकारामानें ऐकतांच, घराच्या मागील बाजूस एक लुगडें वाळत होतें तें ओढून तिच्या आंगावर टाकून दिलें. असें पाहतांच सर्व लोक आ-श्चर्य करून तुकारामानें संसारावर पाणी सोडलें असें ह्मणूं लागले. इतक्यांत शेजारणी येऊन तुकारामाचे बायकोस वि-चारूं लागल्या. तेव्हां ती ह्मणाली—नवऱ्यानें मला मोहनी घा-लून फसविलें. त्याच्या वचनावर मी भरंवसा ठेवून चाललें तों हा विपरित प्रकार पुढें उभा राहिला ! नेसायचें एक लुगडें होतें तेंही त्यांनीं आतां माहारणीला देऊन टाकलें ! दोन महिनें घरीं आले नाहींत ह्मणून घरीं घेऊन आलें तों प्रकाच मोहनी घालून. सगळ्या संसाराचें वाटोळें केलें !

पोरें पहा कशीं अन्नावांचून तळमळत आहेत, अशा प्रकारें गान्हाणीं सांगूं लागली व ह्मणाली—त्यांनीं पायांचें चिंतन करावयास सांगितलें ह्मणून मी दोन तिनदां चिंतन केलें; तों हें दरिद्र प्राप्त झालें. असा त्या पायांनीं घात केला; तरी आतां देवळांत जाऊन त्या पायांचा समाचार घेतें असें बोलून एक धोंडा डोकीवर घेऊन ते पाय ठेचण्याकरितां देवळांत निघाली. इकडे देव थरथरां कांपूं लागले, असें रुक्मिणीनें पाहतांच कांपण्याचें कारण विचारिलें. तेव्हां देवांनीं तुकारामाच्या बायकोबद्दलची गोष्ट रुक्मिणीस कळविली. रुक्मिणी ह्मणाली—ती येतांच आपण पळून जाऊं व ती गेल्यावर मग परत येऊं. असें ऐकतांच देव ह्मणाले—मी भक्ताधीन आहें आपण येथून गेलों असें तुकारामानें पाहिलें तर त्याला दुःख होऊन, तो आपला प्राण देईल आणि त्याच्याकरितां येथें राहिलों तर त्याची बायको आमच्या पायांवर पाषाण घालील ह्मणून चिंता उत्पन्न झाली आहे. इकडे तुकारामाची बायको क्रोधानें धोंडा घेऊन निघाली, तोंच तुकारामानें कोठें जातेस ह्मणून प्रश्न केला. तेव्हां तिनें सर्व मनांतील हेतु नवऱ्यास कथन केला. तो ऐकतांच तुकाराम मनांत ह्मणाला—आतां हिच्याबरोबर जाऊन हिला नम्रपणानें सांगावें आणि न ऐकल्यास माझ्याच कपाळावर धोंडा घाल असें ह्मणावें. असा विचार करून तिच्या मागोमाग

निघाला. इकडे देव थरथर कांपत होते ते स्वस्थ होऊन विचारांत पडले. तेव्हां रुक्मिणी देवास ह्मणाली—देवा, तुह्मी भयाशीं कांपत होतां आणि आतां कोणाचा आसरा मिळाला ? देव ह्मणाले—तुकारामास माझी करुणा येऊन तो बायकोबरोबर येऊन माझ्याच कपाळांत धोंडा घाल असें सांगणार आहे. तर त्याचें मला दुःख वाटतें. कदाचित ती धोंडा मस्तकावरही घालील. इतक्यांत ती धोंडा घेऊन देवळांत शिरली तोंच तुकारामाचा घात चुकविण्याकरितां रुक्मिणीनें द्वार बंद केलें. तेव्हां बाहेर तुकाराम प्रार्थना करूं लागला. त्याची बायको देवाच्या पायांवर धोंडा घालणार तोंच रुक्मिणी ह्मणाली—देवांनीं तुझा काय अपराध केला आहे. ती ह्मणाली—दोन वेळ हे पाय म्यां आठविले ह्मणून सर्व माझें वाटोळें झालें. त्यामुळें माझें मन संतापून ते पायच नाहींसे करण्याच्या विचारानें मी येथें आलें आहें. असें ऐकतांच रुक्मिणीनें तिला चोळी लुगडें व मूठभर होन दिले. तेव्हां ती ते घेऊन धोंडा टाकून आनंदानें बाहेर आली.

---

## गोष्ट ५० वी.

### तुकारामाची व गजाननाची पंगत.

रुक्मिणीनें होन दिले असें तुकारामास कळतांच, पुनः बायकोला उपदेश करून ते सर्व होन ब्राह्मणांस वांटून

टाकिले. पुढें एके वेळीं असें झालें कीं, चिंचवडांत देव नांवाचे ब्राह्मणास आह्मीं गणपतीचे मोठे, भक्त असा अभिमान होऊन त्यांनीं तुकारामाची परीक्षा पाहण्याचा निश्चय केला. तें जाणून तुकाराम चिंचवडास गेला. ती वेळ दुपारची जेवणाची होती. त्यावेळीं ब्राह्मणांनीं त्यास पान वाढलें. तेव्हां तुकाराम ह्मणाला—माझ्या बरोबर पंढरीनाथासही एक पान ठेवावें. व आपल्या गणपतीलाही भोजनास आपल्या बरोबर बोलवावें. असें ऐकतांच ब्राह्मण गणपति येण्याबद्दल त्याला प्रार्थना करूं लागले. परंतु गणपति येत नाहीं असें पाहून देवब्राह्मण तुकारामास ह्मणाला—पाषाणाची मूर्ति कशी जेवील. आह्मीं गणपतीला नैवेद्य दाखविला त्याचा स्वाद् त्यानें घेतला. तुकाराम ह्मणाला—तुह्मीं नैवेद्य कोणाला दाखविला ? तुमचा गणपति समुद्रांत भक्तास तारण्याकरितां गेला आहे. याची प्रचीति आतां तुह्मांस कळेल. असें बोलतांच गणपतीजवळ जाऊन ब्राह्मण पाहूं लागले. तों गणपतीचें अंग व पीतांबर पाण्यानें भिजला आहे. असें पाहून तुकारामास ह्मणाले—हें तुह्मांला कसें कळलें ? तेव्हां एक ब्राह्मण म्हणाला—यानें रुक्मिणीपतीला जर स्वाधीन केला आहे, तर इतर देवतांची काय कथा ! त्यांचीही गति याला पूर्णपणें कळते असें बोलून तुकारामास म्हणाले—तुम्ही पांडुरंगाला जेवणास आणणार तसा गणपतीलाही घेऊन या. असें

तुकारामानें ऐकतांच गजवदनाची प्रार्थना करून पांडुरंगा-बरोबर पंक्तीस बसविलें. पण ते दोघे कोणासही दिसले ना-हींत.पानावरील अन्न सरून पानें रिकामीं झालेलीं पाहतांच ब्राम्हणांस आश्चर्य वाटून त्यांच्या गर्वाचें निरसन झालें. नंतर तांबूल विडे दिले, रात्रौ तुकारामानें तेथें कीर्तन करून तो दुसरे दिवशीं घरीं जाण्यास निघाला. तों वाटेंत एका माळ्याचा मळा लागला. त्या माळ्यानें तुकारामास मळ्यांत नेऊन उंसाचा रस पाजला आणि घरीं नेण्याकरितां उंसाचीं कांडीं दिलीं, तीं घेऊन तुकाराम गांवांत येतांच, तीं कांडीं इतर मुलांस वाटलीं व एक घरीं घेऊन आला. तें बा-यकोनें हातीं घेऊन क्रोधानें कठिण शब्द त्यास बोलून तें कांडें त्याच्या पाठीवर मारलें, त्या बरोबर त्याचे तीन तुकडे झाले. असें पाहतांच तुकाराम ह्मणाला–आतां मात्र बरोबर वाटणी झाली! खालीं पडलेले दोन भाग एक मुलांचा व एक माझा! असें ऐकतांच त्याची तो शांति पाहून बायको स्तब्ध झाली.

तुकारामानें चरणचालीनें सतत तीनवर्षे पंढरीची वारी केल्यावर त्यास शीतज्वर येऊं लागला. त्या मुळें त्याची वारी अंतरून तो देवाचा धांवा करूं लागला आणि ह्मणाला–देवा, मी तुझा कोणता अपराध केला ह्मणून मला अशा दुःखांत लोटून दिलें. अशा प्रकारें करुणा

भाकित असतां वारकरी पंढरीस निघाले. त्यांच्या हातीं एक पत्र व निरोप तुकारामानें देवास पाठविला. ते "पत्रिकेचे अभंग" यानांवानें प्रसिद्ध आहेत.

---

## गोष्ट ५१ वी.

### तुकाराम देवास आपले भेटीस बोलावितो.

तुकारामानें देवास दिलेले पत्रांतील अभंग वारकरी पंढरीस येऊन महाद्वारीं गाऊं लागले. ते ऐकतांच, देवास तुकारामाच्या करुणावाणीचा गहिंवर आला आणि तो रुक्मिणीस ह्मणाला—माझा प्रियकर तुकाराम दृष्टीस पडत नाहीं त्यामुळें मला फार दुःख होत आहे. त्याच्या भेटीला जावें. तर येथें यात्रा जमली आहे. त्यासाठीं काय विचार करावा तें मला सुचत नाहीं. रुक्मिणी ह्मणाली—त्याला आणण्याकरितां गरुडास पाठवावा ह्मणजे तो आपल्या पाठीवरून घेऊन येईल; असें देवांनीं ऐकतांच गरुडास ह्मणाले—तूं देहूस जाऊन माझ्या प्रियभक्तास पाठीवरून घेऊन ये. असें सांगून देवांनीं एक पत्र लिहून तुकारामास दिलें, त्यांत लिहिलें कीं, तुझा वारकऱ्यांचे तोंडचा निरोप ऐकतांच माझे प्राण कासाविस झाले आहेत. मी तुझ्या भेटीकरितांच यावयाचा पण येथें यात्रा जमल्याकारणानें माझें येणें झालें नाहीं, तरी तुला आणण्या-

करितां गरुडास पाठविला आहे, त्याच्या पाठीवर बसून मला लवकर भेट दे. असें पत्र लिहून गरुडाजवळ दिलें आणि त्यास रवाना केलें. स्वामीच्या आज्ञेप्रमाणें गरुड तुकारामाजवळ आला. तों तुकाराम पांडुरंगाच्या भेटीकरितां रात्रंदिवस तळमळत आहे असा पाहून गरुडानें त्याला आलिंगन देऊन देवाचा निरोप कळविला. तो ऐकतांच भेटीकरितां आतुर झालेला तुकाराम क्षेम कुशल विचारूं लागला. नंतर गरुड पाठीवर बसण्याबद्दल तुकारामास सांगूं लागला. तेव्हां तुकारामानें ती गोष्ट नाकारून त्वां देवासच येथें घेऊन यावें असा निरोप देऊन पाठविला. गरुड देवाजवळ येऊन तुकारामाचा निरोप सांगूं लागला. तो ऐकतांच, देव तुकारामाच्या भेटीकरितां विव्हळ होऊन रुक्मिणीस अंतर खूण सांगूं लागले. तेव्हां रुक्मीण ह्मणाली—आतां येथें यात्रेस वारकरी आले आहेत तरी गोपाळकाला झाल्यावर आपण तुकारामाचे भेटीस जाऊं. तें रुक्मिणीचें वचन देवांनीं कबूल केलें.

महाराष्ट्रांत देवपैठण ह्मणून गांव आहे. येथें निंबराज कुळकर्णी ह्मणून एक वैष्णव भक्त राहात असे; तो प्रपंच व्यवहार करीत असतां त्याला अनुताप होऊन तीर्थयात्रेस निघाला. त्यानें बारा ज्योतिर्लिंगें, सप्तपुऱ्या, रामेश्वर इत्यादि तीर्थें करून आश्रमास आला व मनांत हरिकीर्तन करावें अशी इच्छा धरून भगवंताचें नामस्मरण करूं ला-

गला. एकेदिवशीं तो निद्रिस्थ असतां गणपति स्वप्नांत येऊन त्याच्या हातावर मुखांतील तांबूल देऊन ह्मणाले– हा प्रसाद भक्षण कर ह्मणजे त्यायोगें तुला अभ्यासाशिवाय ज्ञान प्राप्त होऊन हरीचे गुण वर्णन करतां येतील व रंगदेवता कीर्तनांत येऊन नाचेल. असा दृष्टांत पाहून जागा झाला तों तेथें कोणी नाहीं. मुखांत तांबूल असून हाताला ही डाग लागला आहे; तो धुवून टाकूं लागला पण तो जाईना. त्या दिवसापासून तो कीर्तन करूं लागला. नंतर पंढरीस आला, तेव्हां देव रुक्मिणीस ह्मणाले–निंबराजाला वरदान द्यावें. असें ऐकतांच रुक्मिणीनें माळणीचें रूप घेऊन पाटांत गाजरें भरून रस्त्यावर बसली. तोंच तिकडून निंबराज आले, त्यांस रुक्मीण ह्मणाली–अहो, ही माझी पाटी येथें क्षणभर राखा, मी माझ्या तान्ह्या मुलाला घेऊन येतें, असें सांगून राउळांत गेली. बराच वेळ झाला तरी रुक्मीण येत नाहीं असें पाहून, निंबराज पाटी उघडून पाहूं लागला. तों त्या पाटींत सुवर्णाच्या कळ्या निघाल्या, त्या पाहतांच निंबराज मनांत ह्मणाला–आदिमायेनें मजवर माया टाकून या अनर्थामध्यें पाडलें आहे. असें समजून तो पाटी तेथेंच टाकून राउळांत आला आणि देवास नमस्कार करून ह्मणाला-देवा, तुझ्या कृपेची मी इच्छा करीत आहें. तरी मला अशा गुंत्यामध्यें घालूं नको. नंतर रुक्मिणीला नमस्कार करून घरीं येऊन प्रेमभा-

यानें भजन करूं लागला. इकडे रुक्मिणी देवास झालेलें वर्तमान सांगूं लागली, तेव्हां देव ह्मणाले–माझे भक्त सदोदित उदास असतात. त्यांस आशापाश कधींही बाधावयाचा नाहीं. नंतर दुसरे दिवशीं प्रातःकाळीं वारकरी मंडळी स्नानाकरितां चंद्रभागेवर गेली. त्यांच्या बरोबर निंबराजही निघाला. त्यावेळीं देवांनीं विचार केला कीं, यास कांहींतरी बक्षीस द्यावें. नंतर देव ब्राह्मणाचा वेष घेऊन चंद्रभागेवर निंबराजाजवळ येऊन ह्मणाले–ही माझी टोपी, माळ व मेखला संभाळ मी स्नान करून येतों, असें सांगून चंद्रभागेंत गुप्त झाले. निंबराज वाट पाहून थकला तरी त्यांचा ठिकाण नाहीं. तेव्हां त्यानें सर्व हकीगत संतांस कळविली. संतांनीं सांगितलें कीं, ते पंढरीनाथ तुला बक्षीस देऊन गेले. आतां तीं वस्त्रें तूं अंगावर घाल. असें ऐकतांच तीं आपल्या अंगावर घालून तेथें कीर्तन करूं लागला व भगवंताचीं नामें उच्चारून तुझ्या भजनीं माझा प्रेम असूं दे. असें बोलून नृत्य करूं लागला. चार घटका रात्र उरली असतां असा चमत्कार झाला कीं, एका सावकाराची स्त्री अंगावर पांघरूण घेऊन स्नानास चालली होती. तिला निंबराजाच्या खांद्यावर देव उभे असून, मयूरपिच्छानें वारा घालीत आहेत, असें दिसलें. त्याबरोबर ती देवाचे भेटीकरितां धांवत आली तोंच देव अदृश्य झाले. तेव्हां ती आक्रोश करून निंबराजाचे चरण धरती झाली. असें

स्त्रीनें मंडळीनें पाहतांच त्या बाईस विचारूं लागले. तेव्हां तिनें पाहिलेला चमत्कार मंडळीस कळविला. तें तिचें भाषण श्रवण करतांच सर्व मंडळीस आश्चर्य वाटून ते त्याची प्रचीति पाहूं लागले; तों निंबराजाचे अंगावर टाकलेल्या बुक्यावर सकुमार पावलें उठलेलीं दृष्टीस पडलीं. त्यावेळीं सर्व मंडळीनें निंबराजास व त्या स्त्रीस नमस्कार घातला. नंतर आरती करून कीर्तन आटोपिलें. गोपाळकाला झाल्यावर सर्व वारकरी आपापले गांवीं गेल्यावर देव रुक्मिणीसह गरुडावर बसून तुकारामाचे भेटीस देहूस आले.

## गोष्ट ५२ वी.

### तुकारामाची व देवाची भेट.

तुकारामाची व पांडुरंगाची भेट झाल्यानंतर देव प्रसन्न होऊन ह्मणाले तुला जें काय पाहिजे तें माग. तुकाराम ह्मणाला–देवा, तुझी मला धन संपत्ति कांहीं नको. परंतु तुझ्या भजनीं निरंतर प्रेम देऊन सदोदित आपल्या भक्तांची संगती दे. असें एकतांच देवास आश्चर्य वाटलें. नंतर देव ह्मणाले–मला आतां भूक लागली आहे तरी जें कांहीं घरांत असेल तें आणून दे. असें ऐकून तुकारामांनीं घरांतील कोरडो भाकरी, भाजी व मीठ आणून देवास दिलें. तें रुक्मिणीनें व पांडुरंगानें मोठ्या

प्रेमानें खाल्लें. नंतर तुकारामास ह्मणाले-तूं मला ज्यावेळीं बोलाविशील त्या वेळीं सगुणरूपानें तुला भेट देईन; असें सांगून देव पंढरीस आले.

आळंदींत एक ब्राह्मण ज्ञानप्राप्तीकरितां अनुष्ठानास बसला असतां, त्यास ज्ञानदेवानें दृष्टांत दिला कीं, तूं तुकारामाला भेटून आपली इच्छा कळीव, ह्मणजे तो तुझा हेतु पूर्ण करील. असा दृष्टांत पाहून तो तुकारामाजवळ येऊन आपला मनोरथ कळविता झाला. तेव्हां तुकारामानें त्यास अकरा अभंग व एक नारळ प्रसादादाखल दिला व ह्मणाला-हा प्रसाद भक्षण केलास ह्मणजे तुला ज्ञान प्राप्त होईल. असें ऐकतांच त्या ब्राह्मणास भरंवसा न वाटून तो प्रसाद तेथेंच टाकून निघाला. तोंच त्या ठिकाणीं शिवाजीराजाचे पदरीं असलेला एक अज्ञानी ब्राह्मण आला. त्यानें तो नारळ उचलून तेथेंच फोडून खाल्ला व अकरा अभंगही घेऊन गेला. नारळ खातांच त्याला ज्ञान प्राप्त जाहलें. पुढें एके ठिकाणीं पुराण चाललें होतें तेथें तो गेला व पुराणिकाला अर्थ चुकल्याबद्दल हा अर्थ कसा केला ह्मणून विचारूं लागला. तेव्हां मंडळीस मोठें आश्चर्य वाटून त्यास विचारूं लागले, तेव्हां त्यानें तुकारामानें दिलेल्या प्रसादाचा हा गुण असें सांगितलें, तें ऐकतांच ब्राह्मण ह्मणाले--तुकाराम भगवत्भक्त आहे त्याची आपण छळणा करूं नये असा विचार होतांच कित्येक ब्राह्मण ह्मणाला-तुकाराम हा कोण आहे तें

त्याला बोलावून विचारावें. ह्मणजे आपली खात्री होईल. नंतर त्या चिंचवडच्या ब्राह्मणांनीं एक मनुष्य तुकारामास बोलाविण्यास पाठविला. तो तुकारामाचे येथें आला, तों कीर्तन चाललें होतें. त्या कीर्तनांत सर्व मंडळी तल्लीन होत्साती देहभान विसरून गेली होती. त्यामुळें तेथें मशाल धरणारा जो मनुष्य होता, त्या मशाल वर करतांच मंडपास आग लागली. ती कोणाच्याही लक्ष्यांत नाहीं. ती चामारगोंद्यांतील शेखमहंमद नांवाच्या वैष्णवानें आपल्या कीर्तनांत मंडपाला वर उडी मारून विझविली. तेव्हां श्रोतेमंडळीनें उडी मारण्याचें कारण विचारिलें. तो शेखमहंमद ह्मणाला-देहूमध्यें तुकाराम कीर्तन करीत आहे. त्याच्या कीर्तनांतील सर्व लोक आनंदगजरांत असतां मशालीनें मंडपास आग लागली. ती मला कळतांच मी ती विझविली. असें ऐकतांच मंडळीस आश्चर्य वाटून त्यांनीं देहूहून खरी खोटी बातमी आणण्याकरितां, देहूच्या पाटलाला पत्र लिहिलें कीं, "रात्रीची तुमच्याकडे झालेली हकीगत लिहून पाठवावी " असें पत्र येतांच पाटलानें झालेली हकीगत लिहून कळविली. ती ऐकतांच सर्वांची खात्री झाली. ही गोष्ट चिंचवडाहून आलेल्या मनुष्यानें ऐकतांच त्यास कांहींच आठवेनासें झालें. इकडे चिंचवडास वाट पाहून थकले, ह्मणून दुसरा मनुष्य पाठविला, तोही तुकारामाचे कीर्तनांत गुंग झाला. नंतर तिसरा

पाठविला त्याचीहो तीच स्थिति झाली. पाठविलेल्या तीन मनुष्यांपैकीं, एकही आला नाहीं असें पाहून ते ब्राह्मण तुकारामाचे भेटीकरितां निघाले. तेव्हां इकडे तुकारामानें ब्राह्मण भेटीस येत आहेत असें अंतर्ज्ञानानें जाणून त्यांस सामोरा जाऊन अर्ध वाटेंत भेटला. तेव्हां ब्राह्मण ह्मणाले— तुझ्या दर्शनानें आमचे मनोरथ पूर्ण झाले. त्वां या कलियुगांत अवतार घेऊन अघटित करणी करून दाखविली; तरी आपण कोण आहां तें आह्मांस कृपा करून सांगावें. असें ऐकतांच तुकाराम मनांत ह्मणाला—यांस प्रचीति दाखविल्या शिवाय यांचे संशयाचें खंडण व्हावयाचें नाहीं, असा विचार करून त्यांच्या समक्ष आपल्या मांडीची कातडी ओढून चिरून दाखविली. तींत सर्व कापूस भरला आहे असें त्या ब्राह्मणांस दिसलें. तेव्हां ते ह्मणाले-हा केवळ जगद्गुरूच अवतरला आहे; यास मनुष्य असें ह्मणूं नये. असें बोलून नमस्कार घालून ह्मणाले—आपण चिंचवडास चलावें. तेथें एक रात्र कीर्तन करून परत यावें-असें ऐकून तुकाराम चिंचवडास गेला. तों लोहोगांवचे गृहस्थांनीं तुकारामाची कीर्ति ऐकून, आपल्या गावांत तुकारामास घेऊन गेले. तेथें एक महिना राहून कीर्तन करूं लागले. त्या गांवांतील एक व्यापारी घोड्यावर बसून झोंप घेत चालला होता त्यास पंढरपूरचे हरिदास

भेटले. त्यांनीं दिवसा झोंप घेण्याचें कारण विचारिलें. तेव्हां त्या व्यापाऱ्यानें तुकारामाचे कीर्तनांत जाग्रण झाल्याचें सांगितलें. तें ऐकून ते हरिदास म्हणाले आपण लोहगांवांत जाऊं नये; कारण तुकारामापुढें आपले कांहीं चालावयाचें नाहीं. असा विचार करून ते पुढें चालले. ती बातमी गांवांतील लोकांनीं तुकारामास कळविली. तेव्हां तुकारामानें त्यांस पुढें बोलावणें पाठविलें आणि आपण अर्धमार्गांत त्यांस भेटण्यास गेला. उभयतांच्या भेटी विचारपूस झाल्यावर हरिदास म्हणाले–आमच्या मुलाचें लग्न वैशाख मासीं आहे म्हणून आम्हीं फिरावयास निघालों आहों. असें ऐकतांच तुकारामानें लोहोगांवांतील लोकांपासून धर्मार्थ वर्गणी जमा करून त्यास दिली. परंतु त्या गांवांत एक माळी सर्वांचा द्वेष्टा असा होता, त्याजकडे कोणी मागावयास जाईना. तेव्हां तुकारामानें मुद्दाम मनुष्य पाठविला. तो माळ्याचे घरीं येऊन वर्गणी मागूं लागला. पण तो उलट तुकारामाची व इतर जनांची निंदा करूं लागला. ती ऐकतांच त्याची बायको म्हणाली. आतां मनांत कांहीं विचार करा. आणि धर्माला द्या. असें बायकोचें वचन ऐकतांच तो रागानें म्हणाला–जा तो पाण्याचा तांब्या आहे तो दे. असें सांगतांच तिनें तांब्या आणून दिला, तो घेऊन तुकारामापुढें आणून ठेविला. तो पाहतांच तुकाराम म्हणाला–हें सुवर्णपात्र आहे. लोक म्हणाले–

अहो तो पितळेचा तांब्या उजळल्यामुळें सोन्यासारखा दिसत आहे. असें ऐकतांच तुकारामानें तो तांब्या अग्नींत तापवावयास सांगितला. अग्नींत घालून तापवितांच तें भांडें सुवर्णाचें झालें. असें पाहतांच सर्वांस मोठें आश्चर्य वाटलें. नंतर हरिदासास तो तांब्या व जमा केलेली वर्गणी देऊन रवाना केलें. आणि तेथून तुकाराम देहूस आला.

एकेदिवशीं तुकाराम इंद्रायणीचे स्नानास गेला असतां; देवांनीं ब्राह्मणाचा वेष घेऊन त्यास भेटून आशीर्वाद दिला. तेव्हां तुकारामानें घरीं भोजनास चलावें, ह्मणून आग्रह केला. ब्राह्मण ह्मणाला-मला पावशेर तुप देशील तर येईन, असें ऐकतांच तें त्यास कबूल करून तुकाराम घरीं घेऊन आला व बायकोस साहित्य देण्यास सांगूं लागला. तेव्हां बायको क्रोधानें ह्मणाली—घरांत तिळभर अन्न नाहीं आणि हा ब्राह्मण कोठून घेऊन आलांत ! याला पावशेर तुप कोठचें देऊं ? असें ऐकतांच देव अदृश्य झाले. असा स्वप्न दृष्टांत पाहून जागा झाला, आणि पाहतो तों कोणी नाहीं. तेव्हां तो देवाची प्रार्थना करूं लागला. अशी तुकारामाची कीर्ति फारच वाढत चालली असें निंदकांनीं पाहतांच, त्याच्या कवित्वाच्या वह्या इंद्रायणींत बुडवून टाकिल्या व ह्मणाले—हें तुझें कवित्व आह्मांस रुचत नाहीं; हें पाखंड रचून लोकांस नादीं लाविलें आहेस. तरी हें खरें असेल तर तेरा दिवसांत पंढरीनाथ कोरड्याच वह्या

इंद्रायणींतून काढील. असें सांगून ते निंदक निघून गेले. इकडे तुकारामानें देउळांत जाऊन अन्नपाणी, कंद, मूळ वर्ज्य करून देवाच्या पायाशीं धरणें धरून आलेलें संकट निवारणाची प्रार्थना तो करूं लागला. तेव्हां देवांनीं बालरूपानें भेट देऊन संकट निवारण्याचें अभय देऊन गुप्त झाले. तराव दिवशीं निंदक जाऊन पाहतात तों वह्या जशाच्या तशा कोरड्या निघाल्या असें पाहतांच, निंदकांस पश्चात्ताप होऊन तुकारामाचा छळ केल्याबद्दल क्षमा मागूं लागले व त्या कोरड्या वह्या देवळांत आणून टाकल्या. त्या पाहतांच तुकारामास आल्हाद वाटून, देवावर भार घातल्याबद्दल दुःख करून. ह्मणाला. यापुढें जरी दुर्जनानीं मला पिडलें, मारलें, छळलें तरी तुझ्यावर संकट घालणार नाहीं. देवा! माझ्या सर्व चिंतेचें निरसन करून, कर्मजाळापासून सोडवून, त्वां माझ्या हृदयमंदिरांत असावें. अशी प्रार्थना करून अंतर्गाभारांत जाऊन देवास आलिंगन दिलें. नंतर पुढें देहासहित तुकाराम वैकुंठभुवनास जाता झाला.

---

## गोष्ट ५२ वी.

### बोधलेबुवा.

वालेघांटावर धामणगांवांत माणकोजीबोधला जगताप या

घा. कारण आमचें बिऱ्हाड देवळांत असल्यामुळें, तेथें सवड नाहीं. असें ऐकून बोधल्यानें शेणी व विस्तव आणून देतांच देवांनीं पीठ मळून पानगे भाजण्यास सुरवात केली. हा प्रकार रुक्मिणीनें जाणून वृद्ध ब्राह्मणीचें रूप घेऊन त्या ठिकाणीं येऊन देवास ह्मणाली—आपले यजमान आले आहेत, ह्मणून मी स्वयंपाक करावयास आले आहें. असें बोलून तिनें पानगे भाजले आणि तीन पात्रें वाढून, बोधल्यास पंक्तीस बोलावूं लागली तेव्हां बोधला ह्मणाला—अगोदर तुह्मीं जेवा नंतर मी प्रसाद घेइन असें सांगतांच, तीं जेऊं लागलीं. त्यांचें जेवण झाल्यावर उच्छिष्ट पात्र ठेवून तीं गुप्त झालीं. असा चमत्कार पाहतांच बोधल्यास आश्चर्य वाटून प्रसाद भक्षण करून, देवळांत येऊन देवाची प्रार्थना करूं लागला. तेव्हां देवांनीं तुला उद्यां कौतुक दाखवीन असें सांगितलें. दुसरे दिवशीं एका सावकारानें सहस्रभोजन घातलें. त्या ठिकाणीं देव बोधल्यास घेऊन गेले, आणि ह्मणाले—आतां तूं दूर उभा राहून कौतुक पाहा. सर्व ब्राह्मण गोळा झाल्यावर देवांनीं वृद्ध ब्राह्मणाचें रूप घेऊन, त्यांच्या जवळ येऊन मी क्षुधित ब्राह्मण आलों आहे. असें ह्मणाले—तेव्हां सावकारानें सांगितलें--येथें कांहीं मिळावयाचें नाहीं, तूं

आलास तसा परत जा. असें सांगतांच देव वळेच पाना-
वर जाऊन बसले. त्या बरोबर त्याला सावकारानें मारून
बाहेर काढलें. देव निघून जातांच, मोठा वारा सुटून
त्या सावकाराचा तंबू उडून जाऊन पात्रांवर मृत्तिका
उडाली. तेंव्ह सर्व ब्राह्मण उठून चालते झाले. असा
चमत्कार दाखवून देव बोधल्यास ह्मणाले—पाहिलेंसना.
अशा प्रकारचे दांभिक लोक आहेत ह्मणून तुझा शुद्धभाव
पाहून तुझ्या जवळील अन्न भक्षावयास आलों नंतर
बोधला देवाची आज्ञा घेऊन धामणगांवास येण्यास
निघाला. तों मार्गांत एक अरण्य लागलें. त्या मुळें बोधला
भुकेनें व्याकुळ झाला. तें पाहून, तेथें एक मळा निर्माण
करून, त्या मळ्यांत देव बोधल्यास घेऊन गेले व त्याची
क्षुधा, तृषा शांत करून, त्यास मार्गास लाविलें. कांहींसा
पुढें गेल्यावर मागें पाहतो तों तेथें कांहींच नाहीं. असें
पाहून मला पंढरीनाथानें भेट दिली असें समजून घरीं
जाऊन, बायकोस सर्व वृत्तांत सांगूं लागला.

एके दिवशीं बोधला शेतांतील कणसांची राखण करीत
असतां बायको भाकरी घेऊन शेतांत आली. आणि ह्म-
णाली—तुह्मीं हुरडा वांटून टाकितां मग पुढें आपला निर्वाह
कसा होईल ? आजपासून जर आपल्या हातानें कोणाला
कणसें द्याल तर तुह्मांस विठोबाची शपथ आहे असें बोलून

घरीं गेली. इतक्यांत पंढरीचे वारकरी त्याच मार्गानें जाऊं लागले; त्यांस पाहतांच बोधल्यानें साष्टांग नमस्कार घातला. त्या ब्राह्मणांनीं त्याचे जवळ चार कणसें मागितलीं. तेव्हां तो ह्मणाला–तुह्मीं आपल्या हातानें तोडून न्या. मी दिलीं असतीं; पण आतांच मला बायको शपथ घालून गेली आहे. असें ऐकून त्यांनीं कणसें तोडून घेऊन चालते झाले. त्याच मार्गानें दुसरे यात्रेकरी जात असतां, त्यांनीं ब्राह्मणाच्या हातांतील कणसें पाहून, बोधल्याजवळ जाऊन कणसें मागूं लागले. तेंच बोधल्यानें तोडून घेऊन जा असें सांगतांच, त्या दोनशें वारकऱ्यांनीं सर्व जोंधळा लुटून फस्त केला. ही बातमी वडील पुत्रास कळतांच तो शेतांत येऊन पाहूं लागला; तों थोटीं ताटें उभीं आहेत अशीं दिसलीं. नंतर बोधल्यानें मुलास उपदेश केला व दोघेही घरीं आले. सत्पात्रीं दान केल्याचें ममताईला कळतांच तिलाही समाधान वाटून बोधल्यास कांहीं न बोलतां, सर्व कुटुंब नामस्मरण करीत राहिलें.

नंतर कांहीं कारणपरत्वें गांवावर पट्टी आली; तेव्हां गांवांतील निंदक लोक ह्मणाले–प्रथम बोधल्याकडील पट्टी वसूल करा, नंतर आह्मीं देऊं. असा त्या लोकांनीं विचार करून बोधल्याचे घरीं हवालदारास पाठविलें

आणि पट्टीबद्दल सात होन द्या. ह्मणून मागूं लागले. बोधल्याचे घरांत तीन होन होते आणि दुसरे चार सर्व गांवांत फिरला तरी मिळाले नाहींत. त्या गांवांत नागाऊ ब्राह्मणीन ह्मणून सावकारीण होती तिचे येथें बोधला गेला आणि ह्मणाला—व्याज अगोदर घेऊन मला चार होन दे. तें वचन तिनें कबूल करून सकाळीं येण्यास सांगितलें. त्या बाईची द्रव्याची चरवी भूमींत पुरून ठेवलेली होती. तींतून त्याबाईनें चार होन काढून ठेविले. प्रातःकाळीं नागाऊ बोधल्यास व्याजीं होन देत आहे असें गांवांतील निंदक लोकांस कळतांच, त्यांनीं नागाऊस भेटून बोधल्याची हकीगत कळविली. प्रातःकाळीं बोधला होन मागण्या करितां त्या बाईकडे येतांच, ती त्या निंदकांच्या बोलण्यावर भरंवसा ठेवून त्यास ह्मणाली—मी दुसऱ्या एका मनुष्याजवळ मागितलें होतें, पण त्यानें देण्याचें नाकारिलें. असें ऐकून तो घरीं आला व बायकोस वृत्तांत कळवून मी राळेगास जाऊन पैसे आणतों, असें सांगून मार्गानें भजन करीत निघाला. इकडे गांवांत बोधला पळाल्याचा बोभाटा झाला, तोंच देवानीं विठ्या माहाराचें रूप धरून चावडीवर होन देऊन सांगितलें कीं, माणकोजी पाटलानें हा सारा पाठविला आहे. दुसरे दिवशीं होन घेऊन बोधला चोगुल्या जवळ आला. तेव्हां

विठ्या माहारानें पैसे आणून दिले असें त्यानें सांगितलें तेव्हां माहारास विचारिलें-तो ह्मणाला-माझ्या घरीं खावयास अन्नसुद्धां नाहीं मग मारा कोठून देऊं ? त्यावरून बोधल्यानें आपल्या मनांत जाणून देवाचा धांवा करितांच देव येऊन भेटले. त्यांस बोधल्यानें विचारिलें-तुह्मीं होन कोठचे दिले ? देव ह्मणाले-तुझ्या घरांतील तीन आणि नागाऊचे चोरून आणिले चार असे सात नेऊन दिले. नंतर देव ह्मणाले-त्या नागाऊचें ठेवणें गुप्त आहे तें मी उडवूनच टाकतों. तिनें तुझा विश्वासघात केला. असें बोलतांच बोधल्यानें चरण धरिले. दुसरें कौतुक असें झालें कीं बोधल्याच्या लुटलेल्या शेतांतील थाटच्या ताटांस कणसें येऊन त्यांच्या धान्यानें सर्व पेवें भरून गेलीं. हें कौतुक दृष्टीस पडतांच सर्व जनांत आश्चर्य वाटून बोधल्याची स्तुति करूं लागले.

## गोष्ट ५४ वी.

### बोधल्यानें हांसीस मुक्त केलें.

राळेर गांवांत बोधल्याची सासुरवाड होती. त्याचा सासरा मरण पावल्यावर दोघे मेहुणे तेथील पाटिलकी चालवीत असत. त्यांच्या पदरीं हांसीकुणबीण ह्मणून एक दासी होती. ती संसारधंदा करीत असतां श्रीहरीचें नाम आठवीत असे. ती त्यांचे शेतांत राखण करीत असे.

तें शेत आणि बोधल्याचें शेत जवळ जवळ होतीं. बोधला शेत राखीत असतां हरीचे गुणानुवाद गाई. ते ऐकण्या करितां ती जवळ येऊन बसत असे. ती एके दिवशीं बोधल्याचे पाय धरून ह्मणाली. जेणें करून जन्माचें सार्थक होईल; असा मला उपाय सांगा. तें ऐकून बोधला ह्मणाला—तूं एकादशी करून निरंतर श्रीहरीचें चिंतन करीत जा आणि एकादशीस धामणगांवांत कीर्तनास ये. हा नेम आपल्या धन्याला विचारून कर ह्मणजे तुला पांडुरंगाच्या सगुण रूपाची भेट होईल. त्या प्रमाणें तिणें नित्यनेम चालविला होता. एके दिवशीं राळेरकर कीर्तनास येत असतां, एकास वाटेंत सर्प चावून त्याचा प्राण गेला. तेव्हां त्यांनीं तें प्रेत बोधलेबुवाच्या कीर्तनांत आणून बसवून ठेविलें. बोधलेबुवांनीं कीर्तनांत विठ्ठलनामाची गर्जना करून टाळ्या वाजविण्याची सर्वत्रांस आज्ञा दिली. त्या प्रमाणें मंडळी टाळ्या वाजवूं लागली. तेव्हां राळेरकर ह्मणाले—हा मनुष्य टाळ्या कां वाजवीत नाहीं ? असें एकून बोधला ह्मणाला—बापा, नरदेहास येऊन भजनाचा आळस करूं नको. हा प्रकार देवांनीं जाणून यमधर्मा-कडून त्याचे प्राण मागें परतविले. तोंच तो मनुष्य टाळ्या वाजवूं लागला. नंतर राळेरकरांनीं झालेली हकीगत कथन केली. ती ऐकतांच श्रोतेमंडळीस आश्चर्य वाटून हांसीचा

प्रेमभाव जास्त वाढला. अशीं तीन वर्षें लोटल्यावर बोधल्याचे मेहुणे विभक्त होऊन, हांसीला विकावयास काढिली. तेव्हां तिनें सर्व वृत्तांत बोधल्यास कळवून, मला आपणच घ्या असें सांगितलें. नंतर बोधल्यानें तिला वचन देऊन पुढें पाठविली व आपण मागुन गेला आणि मेहुण्यांस ह्मणाला—ही तुमची कुणबीण मला द्या. जें मोल सांगाल तें पाठवून देतों. असें ऐकतांच ते मेहुणे खवळून बोधल्यास ह्मणाले. आमचें मनुष्य दुसऱ्या एखाद्यास फुकट देऊं; पण तुमचे घरीं देणार नाहीं. हें त्यांचें भाषण ऐकून बोधला हांसीस ह्मणाला—मी तुला विठोबा कडून आपवितों. असें सांगून घरीं येऊन बायकोस झालेलें वर्तमान सांगूं लागला.

इकडे गिराईक येऊन पंचवीस होन देऊन खरेदीपत्र लिहून घेऊन जाणार, तोंच देव ब्राह्मणाचे रूपानें आंगण्यांत उभे राहून हांसीस ह्मणाले तुला बोधल्यानें बोलाविलें आहे. असें बोलून हांसीसह गुप्त झाले व तिची एक मुलगी होती, तिलासुद्धां वैकुंठास घेऊन गेले. तेव्हां ते खरेदी घेणारे, आमचे होन द्या ह्मणून मागूं लागले. त्यांस ते उभय बंधु ह्मणाले—जो ब्राह्मण आला होता त्यानें बोधल्याचें नांव सांगितलें तर त्याचे कडे जा. अशाप्रकारें त्यांचा वाद सुरु झाला.

धामणगांवांतील एक माहार बोधल्यास एकांतीं भेटून उपदेश मागूं लागला. तेव्हां बोधल्यानें देवाचा धांवा करून उपदेश देऊं कीं नको अशाबद्दल देवास विचारिलें. देवानें सांगितलें; तो नीच जातीचा असून अविश्वासी आहे त्याला तूं उपदेश देऊं नको. याची प्रचीती मी दाखवितों पहा. असें सांगून ह्मणाले—उद्यां तुह्मी धान्याची मळणी आहे, तीवर तुझाच बैल त्याला मारावयास सांगून दुसरे कोणाशीं न बोलण्याबद्दल वचन घे. असें सांगून देव जाते झाले. दुसरे दिवशीं तो माहार येतांच त्यांनीं सांगितल्याप्रमाणें त्याला कळविलें. त्यानें तें कबूल करून, बैल मारून शीर राशींत लपवुन कातडें भुसांत ठेविलें व आपण निघुन गेला. इकडे तें मांस शिजवून झाल्यावर बोधल्यानें आप्तवर्गास बोलावुन भोजन घातलें. प्रात:काळीं तो माहार गांवांत जाऊन कुणब्याच्या दारांत बसून भाकरी मागूं लागला. तेव्हां घरधनी दूर हो असें सांगूं लागला. तें ऐकुन तो ह्मणाला--तुमच्यांत व आमच्यांत काय भेद आहे. तुह्मीं रात्रीं बोधल्याचे राशीवर मी मारलेल्या बैलाचें मांस कसें खाल्लें ? असें ऐकतांच सर्वलोक त्यास ह्मणाले—याबद्दलचा पुरावा तूं देशील काय ? माहारानें सांगितलें शीर व कातड्याचा पुरावा आहे.

जवळ आहे चला. असें ह्मणून ते सर्व लोक माहारासह बोधल्याकडे येऊन, पुरावा काढावयास सांगूं लागले. तेव्हां माहार राशींतील शीर व कातडें बाहेर काढून पाहतो तों तें बकऱ्याचें निघालें. असें पाहतांच सर्वलोकांनीं माहारास ठार मारण्याचा विचार केला. तोंच माहार काकुळतीस येऊन त्यानें बोधल्याचे चरण धरिले. तेव्हां बोधल्यानें त्यास अभय दिलें. नंतर सर्वांनीं बोधल्यास विचारलें—तुझा बैल कोठें आहे? असा प्रश्न केला तोंच बैल पहिल्या सारखाच देवानें निर्माण केला.

कोणे एकेकाळीं दुष्काळ पडला, त्यावेळीं आश्विन महिन्यापर्यंत पाऊस न पडून कार्तिकांत स्वातीचा पाऊस सुरू झाला. तेव्हां बोधला बीं विकत आणून मुलासह पेरावयास शेतांत गेला. तिकडून पंढरीची यात्रा चालली. ती यात्रा बोधल्यानें पाहतांच नमस्कार केला. यात्रेकरू ह्मणाले—आपण दुष्काळांत अन्नदान करितां ह्मणून आ-ह्मी या वाटेनें आलों आहों. असें ऐकतांच पेरावयाचें बियाचें भोजन करून यांस घालावें अशी पुत्रास आज्ञा दिली व शेतांत कडू भोंपळे पेरले. ते पिकल्यावर कुटिल जन त्या-च्या शेतांत जाऊन नानाप्रकाचे तर्क चालवूं लागले. व एक भोंपळा फोडून पाहूं लागले—तों त्यांत गहूं निघाले. ती

बातमी मुसलमान बादशहास कळतांच, बोधल्यास धाक-टाकून आपणाजवळ आणविलें आणि भोंपळ्यांत गहूं कसे झाले हें सांग. असें विचारूं लागला. तेव्हां मला माहीत नाहीं असें बोधला ह्मणाला. बादशहास त्याचें भाषण खोटें वाटून त्याला बाटविण्याचा विचार करून मांसाचें पक्वान्न त्यास वाढलें आणि पानावर बसविलें. तों त्या मांसाचीं फुलें व तुळसी झाल्या. असें पाहतांच बादशहानें छळणा केल्याबद्दल क्षमा मागून साष्टांग नमस्कार घातला. नंतर तेथून बोधला धामणगांवीं येऊन श्रीहरीचें चिंतन करीत राहिला.

---

# गोष्ट ५५ वी.

## गणेशनाथ.

बालेघाटावर मारशी उज्जनी नगरांत गणेशनाथ नांवाचा एक वैष्णवभक्त दिवसा अरण्यांत श्रीहरीचें भजन करीत राहून, रात्रौ नगरांत येऊन कीर्तन करीत असे. त्याची कीर्ति ऐकून शिवाजीराजा, त्याचे भेटीस आला. त्याची सप्रेम वाणी श्रवण करून राजास समाधान वाटलें. राजानें विचार केला कीं, आपण नवीन केलेल्या पलंगावर प्रथम नाथास निजवावें. असें मनांत आणून नाथास आपणाबरोबर

घेऊन गेला. जातेवेळीं नाथांनीं मूठभर खडे आपणाबरोबर घेतले होते. राजानें सर्व प्रकारें गणेशनाथाची पूजा अर्चा करून पलंगावर निजविलें पण त्याला झोंप येईना, शेवटीं बरोबर आणलेले खडे पलंगशय्येवर आंथरून वर चार घटिका झोंपी गेला. प्रातःकाळ होतांच राजा नाथाचे भेटीस आला, त्यानें खडे पाहतांच नाथास विचारिलें; तेव्हां गणेशनाथ ह्मणाले—आतां जिवाला सुख दिलें, तरी पुढें दुःख भोगावें लागेल असें ऐकतांच राजाला अनुताप होऊन तो पलंग ब्राह्मणास अर्पण करून त्यानें आजपासून पलंगावर न निजण्याचा निश्चय केला. गणेशनाथ ज्याला उपदेश देई, त्याचें प्रपंचभान जाऊन वैराग्य प्राप्त होई. असे एका वर्षांत त्याचे तीनशेंसाठ शिष्य झाले; तेव्हां कुटिलजन त्याची निंदा करून ह्मणाले—तूं अनेक लोकांस नादीं लावून फसविलेंस. तरी आतां झाडास उपदेश कर. आणि तो आमच्या अनुभवास आला पाहिजे, तर खरा मानूं. असें ऐकतांच नाथानें एक आंब्याचा जुनाट वृक्ष होता त्याला उपदेश देऊन भाकर भाजीचा नैवेद्य पुढें ठेवून भक्षण करण्यास सांगितला, तोंच झाडाचें खोड दुभंग होऊन राहिलें त्यांत प्रसाद

घालतांच तें पूर्ववत झालें. असा चमत्कार पाहतांच सर्व लोक नाथास शरण गेले.

पुढें एके दिवशीं गणेशनाथानें ब्राह्मणांचा गर्व हरण करण्याकरितां माळावरील दगडांकडून कीर्तनांत टाळ्या वाजविल्या. त्यामुळें ते ब्राह्मण गणेशनाथाची स्तुति करूं लागले व आपण धरलेल्या अभिमानाबद्दल क्षमा मागूं लागले. त्यांस पंढरीनाथानें वर देऊन सारशी उज्जनींत यात्रा भरण्याची सुरवात केली, ती साक्ष अद्यापि ठेविली आहे.

## गोष्ट ५६ वी.

### केशवस्वामी.

नमाच केशवस्वामी नांवाचा एक भाविक भक्त देशाटन करीत विजापुरीं आला, त्या दिवशीं एकादशी असल्यामुळें कीर्तनांत मंडळीची गर्दी झाली होती; तेव्हां केशवस्वामीनीं शिष्यास सांगितलें कीं, दुकानावर जाऊन सुंठ आणि साखर खिरापतीस घेऊन ये. आज्ञेप्रमाणें शिष्यानें वाण्याचे दुकानीं जाऊन, त्याला जागें करून सुंठ व साखर मागितली. तों वाण्यानें त्या अंधारांतूनच सुंठीच्या बदलों वचनाग व साखर देऊन त्यास पाठविलें

आणि आपण झोंपी गेला. शिष्यानें बचनाग कुटून आंत साखर मिश्रण करून ठेविली. हें कृत्य भगवंतांनीं जाणलें व ह्मणाले—आज एकादशी असून या कीर्तनांत मोठा अनर्थ होईल व भक्तास कमीपणा येईल असें जाणून तें बचनागाचें विष शोषण करून घेतलें. कीर्तन आटोपतांच मंडळीस प्रसाद वांटिला, तो कित्येकांनीं भक्षण केला व कित्येकांनीं पदरीं बांधून घरीं नेला.

प्रातःकाळ होतांच वाणी जागा होऊन पाहतो तों बचनागाचें पोतें पुढें आहे; असें पाहतांच घाबरून गांवांत जाऊन लोकांस विचारूं लागला व स्मशानांत जाऊन पाहूं लागला तों कोणीच मेलेलें दिसलें नाहीं. असा प्रकार पाहतांच, त्याला चमत्कार वाटून हें विघ्न देवानेंच निवारण गलें असें समजला. इकडे केशवस्वामी देवळांत येऊन पाहतात तों देवाची मूर्ति काळी झाली आहे असें पाहून विचारांत पडले. तोंच तो वाणी आला व त्यानें सर्व वर्तमान सांगितलें. तें ऐकतांच केशवस्वामीनें देवाची पहि-ल्याप्रमाणें होण्याबद्दल प्रार्थना करतांच देव पूर्ववत् झाले व त्यावेळीं वाण्यास पश्चात्ताप होऊन तो पुढें केशवस्वा-मींच्या संगतीनें राहिला.

# गोष्ट ५७ वी.

## गोमाई आवा.

गोमाई आवा ह्मणून एक विधवाबाई पंढरपुरास निघाली. ती गुळंमच्यांजवळ आली तों चंद्रभागेला पुर आला होता. तिच्याजवळ पिठाशिवाय दुसरें कांहींच नव्हतें. इतर लोक नांवाड्यांस पैसे देऊन जात, पण इच्याजवळ पैसे नव्हते ह्मणून तीनावाड्यास पीठ देऊन उतरून लावण्यास सांगूं लागली, पण तें त्यांनीं न ऐकतां तिला मागें लोटून लाविलें. सर्व यात्रा उतरून गेली, तेव्हां ती पंढरीनाथाचा धांवा करूं लागली. तो दिवस दशमीचा होता. घटकाभर रात्र होतांच देव कोळ्याचें रूप घेऊन आले व त्यांनीं तिला भिजल्याशिवाय नदी उतरून पलीकडे नेलें. त्यास मुठभर पीठ गोमाई देऊं लागली पण देव ह्मणाले— मी कोणापासून कांहीं घेत नाहीं. याचे पानगे करून द्वादशीच्या दिवशीं ब्राह्मणास भोजन घालावें. नंतर ती देवदर्शन करून द्वादशीच्या दिवशीं चंद्रभागेवर पीठ घेऊन बसली. पण कोणी जवळ येईना. तेव्हां देव व रुक्मिणी वृद्ध जोडप्याचें रूप घेऊन तिच्या जवळ येऊन तें पीठ घेऊन, गोंवऱ्या जमा करून पानगे भाजून तिघांनीं खाल्ले. नंतर उभयतां गुप्त झालीं

लतिबशहा नांवाचा एक मुसलमान वैष्णवभक्त होता, तो आपलें स्वकर्म सोडून गीता, भागवत श्रवण करून हरिभजन करीत असे. असा प्रकार पाहतांच सर्व मुसलमान राजाकडे जाऊन त्याचें गाऱ्हाणें सांगूं लागले. तें ऐकतांच राजानें त्याचें घर लुटण्याकरितां सेवकांस आज्ञा दिली. ते लतिबशहाचे घरीं येतांच त्यांच्या मनांतील हेतु नाहींसा होऊन ते त्याच ठिकाणीं हरिकीर्तन ऐकत राहिले. गेलेले सेवक परत येत नाहींत असें पाहून स्वतः बादशहाची स्वारी लतिबशहाची छळणा करावयास निघून गेली. त्यावेळीं लतिबशाची भागवताचें पुस्तक वृंदावनाजवळ वाचीत बसला होता व आजूबाजूच्या भिंतींवर नाना प्रकारचीं चित्रें रंगविलेलीं होतीं. असें तें स्थळ पाहतांच बादशाहा क्रोधायमान होऊन ज्या भिंतीवर राधाकृष्णाचें चित्र, राधा, कृष्णास विडा देत आहे, असें काढिलें होतें तें पाहून लतिबशहास ह्मणाला- हें भिंतोवर काय आहे? लतिबशहानें सांगितलें—हें राधाकृष्णाचें चित्र आहे. असें ऐकतांच बादशहा बोलला—तर मग तुझा कृष्ण राधेच्या हातांतील विडा कां खात नाहीं. असें बोलतांच लतिबशहानें श्रीकृष्णाचा अनन्यभावें धांवा केला. तोंच भक्तरक्षक भगवान मनुष्य होतांच श्रीकृष्णा

ल्या विप्रानें तोंड उघडलें व राधेनें विडा मुखांत घातला. त्याबरोबर राधेच्या हातांत विड्याचा हिरवा रंग होता तो नाहींसा झाला. असा चमत्कार पाहतांच, बादशहास आश्चर्य वाटून लोनिवास नमस्कार करता झाला.

---

## गोष्ट ५८ वी.

### संतोबा पवार.

संतोबा पवार ह्मणून एक भगवद्भक्त होता. त्यानें सर्व प्रपंचाचा त्याग करून, मुळामुठानदीच्या संगमीं एका बेटावर अरण्यांत श्रीहरिचिंतन करीत बसला. तेव्हां लोकांस मोठें आश्चर्य वाटून ते ह्मणाले-त्याच्या बायकोस तिकडे पाठवावी ह्मणजे तो परत येईल. तो विचार त्याच्या स्त्रीस सांगतांच ती वस्त्रालंकार मंडित होऊन संतोबाजवळ आली. तिला पाहतांच तूं येथें कां आलीस ह्मणून त्यानें प्रश्न केला. तेव्हां ती ह्मणाली-मी तुमच्या शिवाय दुसरीकडे कोठें जाऊं ? असें ऐकून संतोबा ह्मणाला-तर मग आपलें मन कठिण करून वस्त्रालंकार याचकांस दे. अशी आज्ञा होतांच तिला अनुताप होऊन तिनें वस्त्रलंकार वांटून टाकिले नंतर संतोबानें आपल्या पंचांतील अर्धा पंचा तिला नेसावयास फाडून दिला व उभयतां उदासवृत्तीनें श्रीहरि-

स्मरण करूं लागलीं. नंतर भुकेनें माण व्याकूल होतांच संतोबानें बायकोस गांवांत भिक्षेस पाठविलें व सांगितलें कीं, जर कोणी तुला सगळी भाकर देईल तर घेऊं नको. असें नवऱ्याचें वचन मान्य करून ती भिक्षेस निघाली व हरि-विठ्ठल म्हणत बरोबर हिंडत हिंडत नणदेच्या दारांत आ-ली. तिचा शब्द ऐकतांच नणंद बाहेर येऊन गळ्यास मिठी मारून रडूं लागली. नंतर घरांत जाऊन दोन भाक-ऱ्या आणून तिच्या झोळींत घातल्या, तेव्हां ती म्हणाली–इतकें अन्न मला नको. माझेवर प्राणनाथ रागावतील. असें जरी तिनें सांगितलें, तरी तें न ऐकतां शपथ घालून दोन्ही भाकऱ्या दिल्या. मग तेथून ती संतोबाजवळ आली संतोबानें झोळी उघडून पाहतां दोन भाकऱ्या पाहिल्याबरोबर विचारूं लागला; तेव्हां तिनें नाणंदेचें वर्तमान कळविलें तें ऐकून संतोबानें त्या भाकऱ्या परत नेण्यास सांगतांच, ती नणंदेज-वळ येऊन तिला सर्व वृत्तांत कळवून मागें फिरली. तों भिंवरानदी तुडुंब भरून चालली आहे. असें पाहतांच कष्टी होऊन देवाचा धांवा करूं लागली. तोंच देव नावाड्याचें रूप घेऊन आले व तिला पलीकडे पोंचती करून गुप्त झाले. तो वृत्तांत तिनें पतीस कळविला. तेव्हां तो म्हणाला–तुला पंढरीनाथानें भेट दिली आणि माझा अंत कां पाहत आहे !

पारगांवांत एक वाणी भाविकभक्त होता, त्याच्या स्वप्नांत जाऊन देवांनीं सांगितलें कीं, त्वां संतोबाला पक्कान्न करून घालावें. त्याप्रमाणें त्यानें सिद्धता करून संतोबाजवळ येऊन वृत्तांत कळवून भोजनास नेऊं लागला. तेव्हां संतोबा ह्मणाला—देवानें तुला दर्शन दिलें आणि माझा अंत पाहतो आहे तरी त्याचें दर्शन झाल्याशिवाय मी अन्न घेणार नाहीं असा त्याचा निश्चय पाहून देवांनीं त्यास दर्शन दिलें. त्यानंतर रांजणगांवांत एक ब्राह्मण होता तो नेहमीं बायकोजवळ भांडण करून ह्मणत असे कीं, मी संतोबा सारखा होईन. एके दिवशीं संतोबा त्या ब्राह्मणाचे आंगणांत भिक्षेस आला तेव्हां त्याला भिक्षा घालून त्या ब्राह्मणस्त्रीनें त्यास नवऱ्याची हकीगत सांगितली. तेव्हां संतोबांनीं सांगितलें कीं, आज त्यानें भांडण केलें आणि संतोबासारखा होईन ह्मणाला, तर तूं वेसाशक व्हा, जा असें बोल. ह्मणजे मी त्याला ताळ्यावर आणीन. असें सांगून निघून गेला. ब्राह्मण घरीं येतांच नेहमीं प्रमाणें बोलूं लागला. तोंच बायको ह्मणाली—जा आतांच उशीर नको. व्हा पाहूं संतोबा सारखे. हें ऐकतांच तो ब्राह्मण तांब्या पंच्या बरोबर घेऊन संतोबाजवळ आला व मी शरण आलों आहें असें सांगूं लागला. तेव्हां संतोबा ह्मणाला बरें तर तांब्या पंच्या येथें ठेवून आधीं

मला पाणी आणून दे. तें ऐकून ब्राह्मण नदीवर गेला. मागें संतोबानें त्याचें धोतर फाडून तांब्या फेकून दिला. ब्राह्मण पाणी घेऊन आला तों त्याला भूक लागली; ह्मणून संतोबास विचारूं लागला. तों संतोबानें त्यास कडूनिंब खावयास दिला; तो त्याच्यानें खाववेना. तेव्हां त्याच्या मनांत आलें कीं, ओली कोरडी भाकर मिळत हाती ती टाकून उगाच येथें आलों त्याची ती स्थिति जाणून तूं येथें कां आलास ह्मणून संतोबांनीं प्रश्न करतांच, भांडणाचें कारण सांगितलें. तें ऐकून संतोबांनीं सांगितलें—आजपासून तूं भांडण न करशील तर तुला घरीं पोंचवितों. त्यानें तें कबूल करून तो घरीं गेला व त्या दिवसापासून भांडण करावयाचें सोडून दिलें.

पुढें एकेवेळीं संतोबा आषाढीचे यात्रेस पंढरीस निघाले, तों सिंहपुराजवळ निरा व भिंवरा यांचा संगम झाला आहे तेथें पर्जन्यामुळें फार पाणी आलें होतें. त्यामुळें जाण्यास साधन नव्हतें तेव्हां त्या पूरांतून तारणारा व मारणारा श्रीहरि असें बोलून संतोबा सर्व यात्रा घेऊन निघाला. तोंच देवांनीं कांसवाचें रूप धरून पाठीवरून सर्व यात्रा पलीकडे नेली. नंतर संतोबा मंदिरांत जाऊन देवाचे गुणानुवाद गाऊं लागले.

# गोष्ट ५९ वी.

## निळोबासंत.

निळोबा या नांवाचा भक्त होता त्याला जें मिळेल त्यांत तो संतोष मानून अतिथिपूजा करीत असे. त्यास पंढरीनाथ कसे पावले तें ऐका:–त्याच्या घरीं मुलीचें लग्न होतें, तेव्हां बायकोस चिंता पडून आतां कसें करावें ह्मणून नवऱ्याजवळ बोलूं लागली. तेव्हां देवांनीं एका वृद्धब्राह्मणाचें रूप घेऊन, धोतरांत थोडें जेवणाचें साहित्य बांधून निळोबाकडे आले आणि तें साहित्य देऊन मला भोजन करून घाला, असें सांगूं लागले. निळोबानें सांगितलें, तुमची सामुग्री नको. असेंच जेऊन जा. तें ऐकून देव ह्मणाले–तरमग हें आपल्या लग्नसामुग्रींत टाका आणि जें झालें असेल तेंच मला घाला. तें निळोबानें मान्य करून त्याला भोजन घातलें नंतर ब्राह्मणरूपी देव ह्मणाले–उद्यां तुमचे येथें लग्न आहे मला फक्त जेवण घालून ठेविल्यास तुमचें सर्व काम करीन. तें निळोबानें कबूल करून त्याला घरांत ठेविला. पांच दिवस लग्न सोहळ्यांत सर्व कामें देवांनीं आटोपलीं. असा तो भोळा ब्राह्मण पाहतां निळोबानें त्याला एक धोतर देण्याचा विचार केला आणि हांक मारूं लागला. तोंच देव गुप्त झाले. तेव्हां निळोबा अंतरांत समजून धांवा करूं लागला. नंतर देव त्या·

च्या स्वप्नांत येऊन मी निरंतर तुझ्याजवळ राहीन असा वर दिला. त्याच्या भक्तीकरितां पिंपळनेरास फाल्गुनवद्य द्वितीयेस महोत्सव होत असतो.

## गोष्ट ६० वी.

### उद्धवचिद्घन.

धारूर गांवांत उद्धवचिद्घन म्हणून एक भक्त होता. तो फिरत फिरत बेदरास आला. त्या ठिकाणीं कीर्तन करून, रामनवमीकरितां जाण्यास आज्ञा मागूं लागला. परंतु त्या लोकांनीं आमच्या येथेंच रामजयंती करावी, असा आग्रह केल्यावरून तेथेंच राहिला. जयंतीच्या दिवशीं दिंड्या पताका सहित वैष्णवमेळा चालला असतां मशीदींत यवन बसले होते ते बाहेर येऊन, शेणमार करून त्या सर्वांची विटंबना केली. तेव्हां ते सर्व हरिदास घरीं गेले आणि झालेली सर्व हकीगत उद्धवचिद्घनास सांगते झाले. नंतर उद्धवचिद्घनानें श्रीरामाचा धांवा आरंभिला तोंच मारुती त्या मशीदीवर जाऊन मशीदीची भिंत हालवूं लागला व एका क्षणांत मशीदीचा विध्वंस करून टाकला. असें पाहतांच फकीरानें बादशाहास जाऊन कळविलें. तेव्हां बादशाहा उद्धवचिद्घनास शरण येऊन, एक हजार रुपये देऊन रामउत्सव करावयास सांगूं लागला. त्याप्रमाणें मोठ्या आनंदगजरानें रामोत्सव सुरू केला.

## विसोबा सराफ.

पंढरीक्षेत्रांत विसोबा सराफ नांवाचा भक्त चौघे पुत्र आणि कांता यांसह राहत असे. तो देवघेवीचा व्यापार करीत असून, कधींही असत्य भाषण करीत नव्हता. तो अतीत अभ्यागतांचा आदरसत्कार करून अन्नदान करीत असे. त्यामुळें सर्व लोक त्याची निंदा करूं लागले, तरी त्याकडे तो मुळींच लक्ष देईना. त्याच्याजवळील द्रव्य संपल्यावर कासेगांवांतील एका पठाणाकडून सातशें रुपये आणून त्यास कर्जरोखा लिहून दिला होता. त्याचें सत्व पाहण्याकरितां पंढरपुरांतील रामपुरीबुवा भिकाऱ्याच्या वेषानें हातांत खापर घेऊन एक प्रहर रात्रीस सराफाचे घरीं आला. त्याचें सराफानें चांगलें आदरातिथ्य करून भोजन घातलें. त्याची अशी निःसीम भक्ति पाहून रामपुरीबुवा आपल्या आश्रमांत गेले. नंतर कुटिलजनांनीं पाठाणास जाऊन सांगितलें कीं, विसोबानें दिवाळें काढलें. तरी आपले पैसे मागावयास जा. असें सांगतांच पठाण त्याचे घरीं जाऊन पैसे मागूं लागला, तेव्हां विसोबानें चौघे जामीन देऊन सात दिवसांचा वायदा केला. साहा दिवस होऊन गेले; तेव्हां आतां काय तजवीज करावी अशी विसोबाला चिंता पडलेली देवांनीं जाणून ते विसोबाच्या

जुन्या गुमास्त्याचें रूप घेऊन पठाणाकडे गेले आणि व्याजा सहित पैसे चुकवून रोखा आणून विसोबाच्या पोथींत ठेविला. दुसरे दिवशीं पोथींत फाडलेला रोखा आढळतांच विसोबा कांता व पुत्र यांस विचारूं लागला-तीं ह्मणलीं. आह्मांस माहीत नाहीं. नंतर त्या फाटलेल्या रोख्यास ठिगळ मारून, बरोबर घेऊन पठाणाकडे गेला. पठाणानें पाहतांच कां आलेत ह्मणून प्रश्न केला. तेंव्हां त्यानें झालेला वृत्तांत त्यास कळविला. तेथून गुमास्त्याकडे येऊन विचारूं लागला; पण तोही मला कांहीं माहित नाहीं असें ह्मणाला. असें एकतांच विसोबाच्या नेत्रांतून आश्रूच्या धारा लागल्या. त्याचा कंठ सद्गदित होऊन देवाजवळ जाऊन अनन्यभावें प्रार्थना करित देवास आळवूं लागला. अशा प्रकारें भक्तपालक भगवान् दासांचा मनोरथ सिद्धीस नेतो. परंतु भक्त भाविक व भोळा असून, विकल्प जाळीं न गुंतणारा असा असला पाहिजे. ज्यांनीं आशापाश तोडून देहाची आशा धरली नाहीं, त्या भक्तांच्या सुरस कथा या पुस्तकांत वर्णन केल्या आहेत. त्या भाविक जनांनीं एकाग्रचित्तानें श्रवण करून जन्मार्चे सार्थक करावें अशी आबालवृद्धांस माझी प्रार्थना आहे.